सऐक्यता । साचारभक्तविभक्तता । सांडूनिजाहला ३२ निर्गुणासिनाहींजन्ममरण । निर्गुणासिनाहींपापपुंण्य । निर्गुणींअनन्यहोतांआपण । मुक्तजाहला ३३ तत्वींवेंटाळूनिघेतला । प्राणीसंशयेंगुंडाळला । आपणासआप णभुलला । कोहंह्मणे ३४ तत्वींगुंतलाह्मणेकोहं । विवेकेंपाहतांह्मणेसोहं । अनन्यहोतांअहंसोहं । मावळली ३५ याउपरीउर्वरिते । तेंचिसत्स्वरूपसंत । देहींअसोनिदेहातीत । जाणिजेऐसा ३६ संदेहवृत्तितेनभंगे । ह्मणोनि बोलिलेंचबोलावेंलागे । आह्मासिहेंघडलेंप्रसंगें । श्रोतींक्षमाकेलीपाहिजे ३७ । ।इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसं वादेषष्ठदशकेमायोद्भवनिरूपणंनामतृतीयःसमासः ॥ ३ ॥ ॥ ध ॥ ॥ ध ॥

श्रीगणेशायनमः । । कृतयुगसत्रालक्षअठावीससहस्त्र । त्रेतायुगबारालक्षशाहण्णवसहस्त्र । द्वापरआठलक्षचौस ष्टसहस्त्र । आतांकलियुगऐका १ कलियुगचारलक्षबत्तीससहस्त्र । चतुर्युगेंबेचाळीसलक्षवीससहस्त्र । ऐशींचतु र्युगेंसहस्त्र । तोब्रह्मयाचाएकदिवस २ ऐसेब्रह्मेसहस्त्रदेखा । तेव्हांविष्णूचीएकघटिका । विष्णुसहस्त्रहोतांऐका पळएकईश्वराचें ३ ईश्वरजायसहस्त्रवेळ । तैंशक्तीचेंअर्धपळ । ऐसीसंख्याबोलिलीसकळ । शास्त्रांतरीं ४ ऐशाअनंतशक्तिहोती । अनंतरचनाहोतीजाती । तरीअखंडखंडेनास्थिती । परब्रह्माची ५ परब्रह्मासीकैंची स्थिती । परीहीबोलावयाचीरीती । वेदश्रुतीनेतिनेती । परब्रह्मीं ६ चारसहस्त्रसातशेंसाठी । इतुकीकलियुगा चीराहाटी । उरल्याकलियुगाचीगोष्टी । ऐसीअसे ७ चारलक्षसत्तावीससहस्त्र । दोनशेंचाळीससंवत्सर । पुढेंअ न्योन्यवर्णसंकर । होणारआहे ८ ऐसेंरचलेंचराचर । येथेंएकाहूनिएकथोर । पाहतांयेथींचाविचार । अंतनल गे ९ एकह्मणतीविष्णुथोर । एकह्मणतीरुद्रथोर । एकह्मणतीशक्तिथोर । सकळामध्यें १० ऐसेआपुलालेपरी बोलती । परंतुअवघेंचिनासेलकल्पांतीं । यदृष्टंतन्नष्टंहेश्रुती । बोलतसे ११ आपुलालीउपासना । अभिमान लागलाजना । याचानिश्चयनिवडेना । साधुविण १२ साधुनिश्चयकरितीएक । आत्मासर्वव्यापक । येरहें अवघेंचिमायिक । चराचर १३ चित्रींलिहिलीसेना । त्यांतकोणथोरकोणसांना । हेंकांतुह्मींविचारानां । आपुले

१ कोणमी. २ तोच मी. ३ मी. ४ तो मी. ५ शेष राहिलेलें. ६ मुक्त. ७ संशय. ८ ब्रह्मदेव. ९ वागणुक. १० देवी, माया. ११ लहान.

ठायीं १४ स्वप्नींउदंडदेखिलें । लहानथोरहिकल्पिलें । परंतुजावेंझालियाझालें । कैसेंपाहा १५ पाहतांजा
गृतीचाविचार । कैचेंलहानकैचेंथोर । झालाअववाविचार । स्वप्नरचनेचा १६ अवघाचिमायिकविचार । कैचें
लहानकैचेंथोर । लहानथोरहानिर्धारें । जाणतीज्ञानीं १७ जोजन्मासप्राणीगेला । तोमीथोरह्मणतांचमेला ।
परीयाचाविचारपाहिला । पाहिजेश्रेष्ठीं १८ जयासझालेंआत्मज्ञानें । तेचिथोरमहाजन । वेदशास्त्रपुराण । सा
धुसंतबोलिले १९ एवंसकळांमध्येंथोर । तोएकचिपरमेश्वर । तयामध्येंहरिहर । होतीजाती २० तोनिर्गुण
निराकार । तेथेंनाहींउत्पत्तिस्थितिसंहार । स्थानमानांचाविचार । ऐलीकडे २१ नावरूपस्थानमान । हातोअ
वघाचिअनुमान । तथापिहोईलनिदान । ब्रह्मप्रलयीं २२ ब्रह्मप्रलयावेगळें । ब्रह्मनांवरूपावेगळें । ब्रह्मकोणी
एक्याकाळें । जैसेंतैसें २३ करितीब्रह्मनिरूपण । जाणतीब्रह्मसंपूर्ण । तेचिजाणावेब्राह्मण । ब्रह्मविद २४ इ
तिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेषष्ठदशकेब्रह्मनिरूपणंनामचतुर्थःसमासः ४ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥
श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रोतेपुसतीऐसे । मायाब्रह्मतेंकैसें । श्रोत्यावक्तयाचेमिषें । निरूपणऐका १ ब्रम्हनि
र्गुणनिराकार । मायासगुणसाकार । ब्रह्मासिनाहींपारावार । मायेसिआहे २ ब्रम्हनिर्मळनिश्चळ । मायाचं
चळचपळ । ब्रह्मनिरुपाधिकेवळ । मायाउपाधिरूप ३ मायादिसेब्रह्मदिसेना । मायाभासेब्रह्मभासेना । मा
यानासेब्रम्हनासेना । कल्पांतकाळीं ४ मायारचेब्रह्मरचेना । मायाखचेब्रह्मखचेना । मायारुचेब्रम्हरुचेना ।
अज्ञानासी ५ मायाउपजेब्रम्हउपजेना । मायामरेब्रह्ममरेना । मायाधरेब्रह्मधरेना । धारणेसी ६ माया
फुटेब्रह्मफुटेना । मायातुटेब्रम्हतुटेना । मायाविटेब्रह्मविटेना । अविटतें ७ मायाविकारीब्रह्मनिर्विकारी । माया
करीब्रम्हकांहींचनकरी । मायानानारूपेंधरी । ब्रह्मतेंअरूप ८ मायापंचभौतिकअनेक । ब्रम्हतेंशाश्वतएक । मा
याब्रह्मांचाविवेक । विवेकीजाणती ९ मायालहानब्रह्मथोर । मायाअसारब्रह्मसार । मायाअतिपारावार । ब्रह्मा
सनाहीं १० सकळमायाविस्तारली । ब्रह्मस्थितिअच्छादिली । परीतेनिवडूनघेतली । साधुजनीं ११ गों

१ निश्चय. २ तत्त्वज्ञान. ३ साधु. ४ विष्णु व शंकर ५ शेवट. ६ जाहाला. अ|ह. वाढला. वृद्धझाला. क्षीणत्व पावला.नष्ट झाला.

डाळसांडूननीरवेइजे । नीरसांडूनक्षीरसेविजे । मायासांडूनअनुभविजे । परब्रह्मतैसें १२ ब्रह्मआकाशाऐसें निवळ । मायावसुंधराडहूळ । ब्रम्हसूक्ष्मकेवळ । मायास्थूळरूप १३ ब्रह्मतेंअप्रत्यक्षअसे । मायातेप्रत्यक्षदिसे । ब्रह्मतेंसमचिअसे । मायातेविषमरूप १४ मायालक्षब्रह्मअलक्ष । मायासाक्षब्रह्मअसाक्ष । मायेमध्यें दोनीपक्ष । ब्रह्मींपक्षचिनाहीं १५ मायापूर्वपक्षब्रह्मसिद्धांत । मायाअसतब्रह्मसत । ब्रह्मासिनाहींकरणेंहेत । मायेसिआहे १६ ब्रह्मअखंडघनदाट ॥ मायापंचभौतिकपोचट ॥ ब्रह्मतेंनिरंतरनिवोट ॥ मायातेजुनीजर्जरी १७ मायाघडेब्रह्मघडेना । मायापडेब्रह्मपडेना । मायाविघडेब्रह्मविघडेना । जैसेंतैसें १८ ब्रह्मअसतचि असे । मायानिरसतांचनिरसे । ब्रह्मसंकल्पांतनसे । मायेसिअसेसंकल्प १९ मायाकठिणब्रह्मकोमळ । माया अल्पब्रह्मविशाळ । मायानसेसर्वकाळ । ब्रह्मचिअसे २० वस्तुनह्वेबोलिजेऐशी । मायाजैशीबोलिजेतैसी । काळपावेनावस्तूसी । मायेसिझडपी २१ नानास्वरूपनानारंग । तितुकामायेचाप्रसंग । मायाभंगेब्रह्मअभंग । जैसेंतैसें २२ आतांअसोहाविस्तार । चालतजातेंसचराचर । तितुकीमायापरमेश्वर । सबाह्यअभ्यंतरीं २३ सकळउपाधिवेगळा । तोपरमात्मानिराळा । जळींअसोनिनातळेजळा । आकाशजैसें २४ मायाब्रह्माचेंविवरण । करितांचुकेजन्ममरण । संतांसिगेलियाशरण । मोक्षलाभे २५ अरेयासंतांचामहिमा । बोलावयानाहीं सीमा । जयाचेनिजगदात्मा । अंतरींचहोय २६ ॥ ॥ इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेषष्ठदशकेमायाब्रह्मनिरूपणंनामपंचमःसमासः ॥ ५ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः । । सृष्टीपूर्वींचब्रह्मअसे । तेथेंसृष्टिमूळींचनसे । आतांसृष्टिदिसतअसे । तेंसत्यकींमिथ्या १ तुह्मीसर्वज्ञगोसांवी । माझीआशंकाफेडावी । ऐसाश्रोताविनवी । वक्तयासी २ आतांऐकाप्रत्युत्तर । कथोसि ह्वेंतरपर । वक्तासर्वज्ञउदार । बोलताजाहला ३ जीवभूतसनातन । ऐसेंगीतेचेंवचन । येणेंवाक्येंसत्यपण । सृष्टीसआलें ४ यदृष्टंतन्नष्टंयेणें । वाक्येंसृष्टिमिथ्यापणें । सत्यमिथ्याऐसेंकोणें । निवडावें ५ सत्यम्हणोंत

१ शाश्वत. २ आंत व बाहेर. ३ जेंपाहिलेलें वस्तु. ४ तेंनाशिवंत.

रीनासे । मिथ्याह्मणोंतरीदिसे । आतांजैसेंआहेतैसें । बोलिजेल ६ सृष्टिमध्येंबहुजन । अज्ञानआणिसज्ञान ।
ह्मणोनियांसमाधान । होतनाहीं ७ ऐकाअज्ञानाचेंमत । सृष्टिआहेतेशाश्वत । देवधर्मतीर्थव्रत । सत्याचिआ
हे ८ बोलेसर्वज्ञाचाराजा । मूर्खस्यप्रतिमापूजा । ब्रह्मप्रलयाच्यापैजा । घालूंपाहे ९ तंवबोलेतोअज्ञान ।
तरीकांकरिसीसंध्यास्नान । गुरुभजनतीर्थाटण । कासयाकरावें १० ॥ ॥ श्लोक ॥ ॥ तीर्थेतीर्थेनिर्मलंब्रह्मवृंदं
दंवृंदेवृंदेतत्वचिंतानुवादः । वादेवादेजायतेतत्वबोधोबोधेबोधेभासतेचंद्रचूडः १ ऐसेंचंद्रचूडाचेंवचन । सद्गुरूचें
उपासन । गुरुगीतानिरूपण । बोलिलेंआदरें ११ गुरूसिकैसेंभजावें । आधींतयासिओळखावें । त्याचेंसमाधा
नघ्यावें । विवेकेंस्वयें १२ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ ब्रह्मानंदंपरमसुखदंकेवलंज्ञानमूर्तिंद्वंद्वातीतंगगनसदृशंतत्त्वमस्या
दिलक्ष्यं । एकंनित्यंविमलमचलंसर्वधीसाक्षिभूतंभावातीतंत्रिगुणरहितंसद्गुरुंतंनमामि १ ॥ ॥ गुरुगीतेचेंवचन
ऐसेंसद्गुरूचेंध्यान । तेथेंसृष्टिमिथ्याभान । उरेलकैंचें १३ ऐसेंसज्ञानबोलिला । सद्गुरुतोवोळखिला । सृष्टिमि
थ्याऐसाकेला । निश्चितार्थ १४ श्रोताऐसेंनमानीकदा । अधिकउठिलाविवादा । ह्मणेकैसारेगोविंदा । अज्ञा
नह्मणतोसी १५ जीवभूतसनातन । ऐसेंगीतेचेंवचन । तयासितूंअज्ञान । म्हणतोसिकैसा १६ ऐसाश्रोताआ
क्षेपकरी । विषादमानिलाअंतरीं । याचेंप्रत्युत्तरचतुरीं । सावधपरिसावें १७ गीतेंतबोलिलागोविंद । त्याचा
नकळेतुजभेद । ह्मणोनियांव्यर्थखेद । वाहतोसी १८ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ अश्वत्थःसर्ववृक्षाणां ॥ टीका ॥
माझीविभूतीपिंपळ । ह्मणोनिबोलिलागोपाळ । वृक्षतोडितांतात्काळ । तुटतआहे १९ ॥ श्लोक ॥ नैनंछिं
दंतिशस्त्राणिनैनंदहतिपावकः । नचैनंक्लेदयंत्यापोनशोषयतिमारुतः १ । । टी० । । शस्त्रांचेनितुटेना । अग्नीचे
निजळेना । उदकामध्येंकालवेना । स्वरूपमाझें २० पिंपळतुटेशस्त्रानें । पिंपळजळेपावकानें । पिंपळकालवेउ
दकानें । नाशवंत २१ तुटेजळेबुडेउडे । आतांऐक्यकैसेंघडे । ह्मणोनिहेंउजेडे । सद्गुरुमुखें २२ इंद्रियाणां
मनश्चास्मी । कृष्णह्मणेमनतोमी । तरीकांआवरावीर्उर्मी । चंचळमनाची २३ ऐसेंकृष्णकांबोलिला । साधनमा

---

१ व्यर्थ, खोटें. २ मूर्ति ३ तीर्थयात्रा. ४ ब्राह्मणांचा समूह. ५ वर्णन. ६ ज्ञान. ७ शंकर. ८ सुखदुःखा वेगळें. ९ आकाश.

॥ ५ ॥

गेंदाखविला । खडेमाडूनिशिकविला । ओनामाजिवीं २४ ऐसाआहेवाक्यभेद । सर्वजाणेतोगोविंद । देहबुद्धीचाविवाद । कामानये २५ वेदशास्त्रश्रुतिस्मृती । तेथेंवाक्यभेदपडती । तेसर्वहिनिवडती । सद्गुरुवचनें २६ वेदशास्त्रांचेंभांडण । शस्त्रेंतोडीऐसाकोण । हेंनिवडेनासाधुविण । कदाकल्पांतीं २७ पूर्वपक्षआणि सिद्धांत । शास्त्रींबोलिलासंकेत । याचाहोयनिश्चितार्थ । साधुमुखें २८ येन्हवींवादाचींउत्तरें । एकाहूनिएकथोरें । बोलूंजातांअपारें । वेदशास्त्रें २९ ह्मणोनिवादविवाद । सांडूनिकीजेसंवाद । तेणेंहोयब्रह्मानंद । स्वानुभवें ३० एकेकल्पनेचेपोटीं । होतीजातीअनंतसृष्टी । तयासृष्टीचीगोष्टी । साचंकेवीं ३१ कल्पनेचाकेलादेव । तेथेंझाला दृढभाव । देवालागींयेतांखेव । भक्तदुःखेंदुखवला ३२ पाषणाचादेवकेला । एकेदिवशींभंगोनिगेला । तेणेंभक्तदुखवला । रडेपडेआक्रंदे ३३ देवहारपलाघरचेघरीं । एकदेवनेलाचोरीं । एकदेवदुराचारीं । फोडिलाबळें ३४ एकदेवजायांचाआणिला । एकदेवउदकींटाकिला । एकदेवनेऊनघातला । पायांतळीं ३५ कायसांगोंतीर्थमहिमा । मोडोनिगेलादुरात्मा । थोरसत्वहोतेंनेमा । कायजाहलेंकळेना ३६ देवघडिलासोनारीं । देववोतिलावोतारीं । एकदेवघडिलापाथारीं । पाषाणाचा ३७ नर्मदागंडिकातीरीं । देवपडिलेलक्षवरी । त्यांचीसंख्याकोणकरी । असंख्यातगोटे ३८ चक्रतीर्थींचक्रांकित । देवअसतीअसंख्यात । नाहींमनींनिश्चितार्थ एकदेव ३९ बाणतांदळेताम्रनाणें । स्फटिकदेव्हारापूजनें । ऐसेंदेवकोणजाणे । खरेकींखोटे ४० देवरेशिमाचाकेला । तोहितुटोनियांगेला । आतांनवानेमधरिला । मृत्तिकेच्यालिंगाचा ४१ आमचादेवबहुसत्य । आह्मासआकांतींपावत । पूर्णकरीमनोरथ । सर्वकाळ ४२ आतांयाचेंसत्वगेलें । प्राप्तहोतेंतेंझालें । प्राक्तननवचे पालटिलें । ईश्वराचेनी ४३ धांतुपाषाणमृत्तिका । चित्रलेपकाष्ठदेखा । तेथेंदेवकैंचामूर्खा । भ्रांतिपडिली ४४ हेआपुलालीकल्पना । प्राक्तनाऐशींफळेंजाणा । परीत्यादेवाचियाखुणा । वेगळ्याची ४५ श्लो० ॥ ॥ नानाशास्त्रविदोलोकानानादैवतपूजकाः । आत्मज्ञानंविनापार्थसर्वकर्मनिरर्थकं १ ह्मणोनिहेमायाभ्रमणे । सृ

॥ ५ ॥

१ खरी. २ घट्ट निश्चय. ३ दगड. ४ गंडकी या नामें नदी. ५ गोमती नदी. ६ प्रारब्ध, दव. ७ सोने वगैरे. ८ बहुत प्रकारचे देव.

ष्टिमिथ्याकोटिगुणें । वेदशास्त्रपुराणें । ऐसींचबोलती ४६ साधुसंतमहानुभाव । त्याचाऐसाचअनुभव । पंच
भूतातीतंदेव । सृष्टिमिथ्या ४७ सृष्टिपूर्वींसृष्टिचालतां । सृष्टिअवघीसंहारतां । शाश्वतदेवतत्वतां । आदिअंतीं
४८ ऐसासर्वांचानिश्चय । यदर्थींनाहींसंशय । व्यतिरेकआणिअन्वय । कल्पनारूप ४९ एकेकल्पनेचेपो
टीं । बोलिजेतीअष्टसृष्टी । तयेसृष्टीचीगोष्टी । सावधऐका ५० एककल्पनेचीसृष्टी । दुसरीशाब्दिकसृष्टी । ति
सरीप्रत्यक्षसृष्टी । जाणतीसर्व ५१ चौथीचित्रलेपसृष्टी । पांचवीस्वप्नसृष्टी । साहावीगंधर्वसृष्टी । ज्वरसृष्टीसा
तवी ५२ आठवीदृष्टिबंधन । ऐशाअष्टसृष्टीजाण । यामध्येंश्रेष्ठकोण । कोणसत्यमानावी ५३ ह्मणोनसृष्टी
नाशवंत । जाणतीसंतमहंत । सगुणं[1]भजावेंनिश्चित । निश्चयालागीं ५४ सगुणाचेनिआधारें । निर्गुण[2]पाविजे
निर्धारें । सारासारविचारें । संतसंगें ५५ आतांअसोहेंबहुत । संतसंगेंकेलेंनेमस्त । येरवींचित्तदुश्चित । संश
यींपडे ५६ तंवशिष्येंआक्षेपिलें । सृष्टिमिथ्याऐसेंकळलें । परीहेंदृश्यं[3]अवघेंनाथिलें । तरीदिसतेंकां ५७
दृश्यप्रत्यक्षदिसतें । ह्मणोनिसत्यचिवाटतें । यासिकायकरावेंतें । सांगास्वामी ५८ याचेंप्रत्युत्तरभलें । पुढिलेस
मासींबोलिलें । श्रोतींश्रवणकेलें । पाहिजेपुढें ५९ एवंसृष्टिमिथ्याजाण । जाणोनरक्षावेंसगुण । ऐसीहेअनुभ
वाचीखूण । अनुभवीजाणती ६० ॥ ॥ इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेषष्ठदशकेसृष्टिकथानिरूपणंनामषष्ठः
समासः ६ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः ज्ञानेंदृश्यमिथ्याझालें । तरीकांपाहिजेभजनकेलें । तेणेंकायप्राप्तझालें । हेंमजनिरूपावें
१ ज्ञानाहूनथोरअसेना । तरीकांपाहिजेउपासना । उपासनेनेंजना । कायप्राप्त २ मुख्यसारतेंनिर्गुण । तेथें
दिसेचिनासगुण । भजनकेलियाचागुण । मजनिरूपावा ३ जेंप्रत्यक्षनाशवंत । त्यासिभजावेंकिंनिमित्त ।
सत्यसांडूनअसत्य । कोणेंभजावें ४ असत्याचाप्रत्ययआला । तरीमगनेमकांलागला । सत्यसांडूनगलबला ।
कासयाकरावा ५ निर्गुणानेंमोक्षहोतो । प्रत्यक्षप्रत्यययेतो । सगुणकायदेऊंपाहातो । सांगास्वामी ६ स

१ वेगळा. २ मूर्ति, ३ निराकार ब्रह्म. ४ दृष्टिगोचर होणारें विश्व. ५ सेवा.

गुणनाशवंतऐसेंसांगतां । पुनःभजनकरावेंह्मणतां । तरीकासयासाठींआतां । भजनकरूं ७ स्वामीचेभिडेनेंबोल
वेना । यऱ्हवींकांहींचिमानेना । साध्यचिझालियासाधना । कांप्रवर्तावें ८ ऐसेंश्रोतयांचेंबोलणें । शब्दबोलेनिर्बु
जलेपणें । याचेंउत्तरऐकणें । ह्मणेवक्ता ९ गुरूचेंवचनप्रतिपाळण । हेंमुख्यपरमार्थाचेंलक्षण । वचनभंगकरितांवि
लक्षण । सहजचिजाहलें १० ह्मणोनिआज्ञासिवंदावें । सगुणभजनमानावें । श्रोताह्मणेंहेंदेवें । कांप्रयोजिलें ११
कायमानिलाउपकार । कोणझालासाक्षात्कार । किंवाप्रारब्धाचेंअक्षर । पुसिलेंदेवें १२ होणारहेंतोंपालटेना । भ
जनेंकायकरावेंजना । हेंतोंपाहतांअनुमाना । काहींचनये १३ स्वामीचीआज्ञाप्रमाण । कोणकरीलअप्रमाण । परं
तुयाचाकायगुण । भजानिरूपावा १४ वक्ताह्मणेसावधपणे । सांगज्ञानाचींलक्षणें । तुजकांहींलागेकरणे । किंवा
नाहीं १५ करणेंलागेभोजन । करणेंलागेउदकप्राशन । मळमूत्रत्यागलक्षण । तेंहिसुटेना १६ जनाचेंसमा
धानराखावें । आपुलेंपारिखेंवोळखावें । आणिभजनचिमोडावें । हेंकोणज्ञान १७ ज्ञानेंविवेकेंमिथ्याझालें । परं
तुअवघेंनाहींटाकिलें । तरीमगभजनेंचिकायकेलें । सांगबापा १८ साहेबासलोटांगणींजावें । नीचासारिखेंव्हा
वें । आणिदेवासनमानावें । हेंकोणज्ञान १९ हरिहर[3]ब्रह्मादिक । हेजयाचेआज्ञाधारक[4] । तूंएकमानवीरंक[5] ।
भजासिनातरिकायगेलें २० आमुचेकुळींरघुनाथ । रघुनाथआमुचापरमार्थ । जोसमर्थांचाहिसमर्थ । देवांसो
डविता २१ त्याचेआह्मीसेवकजन । सेवाकरितांझालेंज्ञान । तेथेंअभावधरितांपतन । पाविजेलकीं २२
गुरुसांगतीसारासार । त्यासकैसेंह्मणावेंअसार । तुजकायसांगणेंविचार । शाहणेजाणती २३ समर्थाचेमनीं
चेंतुटे । तेंचिजाणावेंअदृष्टस्वोटें[6] । राज्यपदापासूनकरंटे । चेवलेजैसे २४ मीथोरवाटेमनीं । तोनव्हेब्रह्मज्ञानी ।
विचारपाहतांदेहाभिमानी । प्रत्यक्षदिसे २५ वस्तुभजनकरीना । नानकरींऐसेंहिह्मणेना । तरीहेजाणावीकल्प
ना । दंडोनराहिली २६ नातेंज्ञाननातेंभजन । उगाचिआलादेहाभिमानं[7] । तेथेंनाहींकींअनुमान । प्रत्ययतुझा
२७ तरीआतांऐसेंनकरावें । रघुनाथभजनींलागावें । तेणेंचिज्ञानबोलावें । चळेनाऐसें २८ करीदुर्जनाचा

१ सत्व. रज- तम. हे तीन गुण या गुणानी युक्त विश्व. २ आणखी. ३ विष्णु व शंकर. ४ सेवक. ५ दरिद्री. ६ दैव. ७ गर्व.

संहार । भक्तजनाचाआधार । ऐसाहातोचमत्कार । रोकडाचाले २९ मनींधरावेंतेंहोतें । विघ्नअवघेंचिनासो
निजातें । कृपाकेलियारघुनाथें । प्रतीतयेते ३० रघुनाथभजनेंज्ञानझालें । रघुनाथभजनेंमहत्त्ववाढलें । ह्मणो
नितुवांकेलें । पाहिजेआधीं ३१ हेंतोंआहेसप्रतीत । आणितुजवाटेनाप्रतीत । साक्षात्कारेंनेमस्त । प्रत्ययकरा
वा ३२ रघुनाथस्मरोनकार्यकरावें । तेंतात्काळचिसिद्धिपावे । कर्तारामहेंअसावें । अभ्यंतरीं ३३ कर्ताराम
मीनव्हेआपण । ऐसेंसगुणनिवेदन । निर्गुणींतेंअनन्य । निर्गुणचिहोइजे ३४ मीकर्ताऐसेंह्मणतां । कांहींच
घडेनासर्वथा । प्रतीतपाहासितरीआतां । शीघ्रंचिआहे ३५ मीकर्ताऐसेंह्मणसी । तेणेंतूंकष्टीहोसी । रामकर्ता
ह्मणतांपावसी । यशकीर्तिप्रताप ३६ एकेभावनेसाठीं । देवासिपडेतुटी । कांतेहोयकृपादृष्टी । देवकर्ताभावि
तां ३७ आपणआहेदोदिवसांचा । आणिदेवबहुताकाळांचा । आपणथोडेबोळखीचा । देवासत्रैलोक्यजाणे
३८ याकारणेंरघुनाथभजन । त्यासिमानितीबहुतजन । ब्रह्मादिकआदिकरून । रामभजनींतत्पर ३९
ज्ञानबळेंउपासना । आह्मीभक्तजरीमानुना । तरीयादोषाचियापतना । पावोंअभक्तपणें ४० देवउपेक्षीथोरप
णें । तरीमगत्याचेंतोचिजाणें । अप्रमाणतेंश्लाघ्यवाणें । नव्हेचिकींश्रेष्ठा ४१ देहासलागलीउपासना । आप
णविवेकेंउरेना । ऐशीस्थितिसज्जना । अंतरींची ४२ सकळमिथ्याहोऊनजातें । हेंरामभजनेंकळोंयेतें । दृश्य
ज्ञानियांचेनिमतें । स्वप्नजैसें ४३ मिथ्यास्वप्नविवंचना । तसीहेसृष्टिरचना । दृश्यमिथ्यासाधुजना । कळोंआ
लें ४४ आक्षेपझालाश्रोतयांसी । मिथ्यातरीकांदिसतेंआह्मासी । याचेंउत्तरपुढिलेंसमासीं । बोलिलेंअसे
४५ । । इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेषष्ठमदशकेसगुणभजननिरूपणंनामसप्तमःसमासः ॥ ७ ॥ ॥ छ ॥
श्रीगणेशायनमः । मागांश्रोतींपुसिलेंहोतें । दृश्यमिथ्यातरीकांदिसतें । त्याचेंउत्तरबोलिजेतें । तेंसावधऐका १
खिलेंतेंसत्यचिमानावें । हेंज्ञात्याचेंदेखणेंनव्हे । जडमूढअज्ञानजीवें । हेंसत्यमानिजे २ एकादेखिल्यासाठीं ।
लटिक्याकराव्याग्रंथकोटी । संतमहंतांच्यागोष्टी । त्याहिमिथ्यामानाव्या ३ माझेंदिसतेंहेंचिखरें । तेथेंचालेनादु

१ मोठेपण- २ प्रत्यक्ष, ३ मनामध्यें, ४ लवकर, जलद, ५ ब्रह्मदेव, विष्णु, शंकर वसिष्ठादिक ऋषि- ६ रामचंद्राची सेवा,

सरें । ऐशियांसंशयाच्याभरें । भरोंचिनये ४ मृगेंदेखिलेंमृगजळ । तेथेंधांवेतेबरळ । जळनव्हेमिथ्यासकळ । त्यापशूसिकायह्मणावें ५ रात्रौस्वप्नदेखिलें । बहुतद्रव्यसांपडलें । बहुतजनासिवेव्हारिलें । तेंखरेंकैसेनिमानावें ६ कुशळचितारीविचित्र । तेणेंनिर्माणकेलेंचित्र । देखतांउठेप्रीतिमात्र । परंतुतेथेंमृत्तिका ७ नानावनिताह स्तीघोडे । रात्रौदेखतांमनबुडे । दिवसापाहतांकातडें । कंटाळवाणें ८ काष्टीपाषाणीपुतळ्या । नानाप्रकारें निर्मिल्या । परमसुंदरवाटल्या । परंतुतेथेंपाषाण ९ नानागोपुरींपुतळ्याअसती । वक्रांगेंवक्रदृष्टींपाहाती । लाघवदेखतांभरेवृत्ती । परंतुतेथेंक्रियाभाग १० खेळतांनेटकेंदशावतारीं । तेथेंयेतीसुंदरनारी । नेत्रमोडिती कळाकुसरीं । परीतेअवघेधटिंगण ११ मृष्टिबहुरंगींअसत्य । बहुरूपाचेंहेंकृत्य । तुजवाटेदृश्यसत्य । परीहेंजा णअविद्या १२ मिथ्यासाचासारिखेंदेखिलें । परीतेंपाहिजेविचारिलें । दृष्टितरळतांभासलें । तेंसाचकैसेंमाना वें १३ वरीपाहतांपालथेंआकाश । ऊदकींपाहतांउताणेंआकाश । मध्येंचांदण्याचाहिप्रकाश । परीतेंअववेंमिथ्या १४ नृपतीनेंचितारीआणले । ज्याचेत्याऐसेपुतळेकेले । पाहतांतेचिऐसेगमले । परीतेंअववेंमायिक १५ नेत्रींकां हींबाहुलीनसे । जेव्हांजेंपाहावेंतेव्हांतेंभासे । डोळांप्रतिबिंबदिसे । तेंसाचकैसेनी १६ जिनुकेबुडबुडेउठती । तितु क्यांमध्येंरूपेंदिसती । क्षणामध्येंफुटोनजाती । रूपेंमिथ्या १७ लघुदर्पणेंदोनिचारीहातीं । तितुकींरूपेंप्रतिबिं बती । परीतेमिथ्याअंतीं । एकचिमुख १८ नदीतीरींभारजातां । दुसराभारदिसेपालथा । कांपडसादाचाअवचितां । गजरउठे १९ वापीसरोवरांचेंनीर । तेथेंपशुपक्षीनरवानर । नानापत्रेंवृक्षविस्तार । दिसेदोहींसवा २० एक शस्त्रझाडूंजातां । दोनदिसतीतत्वतां । नानातंतुटणत्कारितां । द्विधाभासती २१ कांतेदर्पणाचेमंदिरीं । बैसली सभादिसेदुसरी । बहुतदीपांचियेहारीं । बहुतछायादीसती २२ ऐसेंहेंबहुविधभासे । साचासारिखेंदिसे । परी हेंसत्यह्मणोनेंकैसें । विश्वासावें २३ मायामिथ्याबाजेगिरी । दिसेसाचाचियेपरी । परीहेजाणत्यानेंखरी । मानू चिनये २४ लटिकेंसाचाऐसेंभावावें । तरीमगपारखीकासयाअसावें । एवंयेअविद्येचेगोवे । ऐसेचिअसती ।

॥ ७ ॥ ॥ ७ ॥

१ ज्यास्थळीं खरोखर उदक नसून उदकासारखा भास होतो त्यास मृगजळ. असें ह्मणतात. २ दगड. ३ बायका. ४ नेत्रकटाक्ष.

२५ मनुष्यांचीबाजेगिरी । बहुतजनावाटेखरी । शेवटपाहतांनिर्धारीं । मिथ्याहोय २६ तैशीचमावराक्ष सांची । देवांसहिवाटेसाची । पंचवटिकेसिमृगाची । पाठीवेतलीरामें २७ पूर्वकायापालटिती । एकाचेचिबहु तहोती । रक्तबिंद्वींजन्मती । रजनीचर २८ नानापदार्थफळेंचिझाले । द्वारकेमध्येंप्रवेशले । कृष्णेंदैत्यकितीवधि ले । कपटरूपी २९ कैसेंकपटरावणाचें । शिरकेलेमावेचें । काळनेमीच्याआश्रमाचें । अपूर्वकैसें ३० ना नादैत्यकपटमती । जेदेवांसहिनाटोपती । मगनिर्माणहोऊनशक्ती । संहारकेला ३१ ऐसीराक्षमांचीमाव । जाणोंनशकतीदेव । कपटविद्येचेंलाघव । अघटितज्यांचें ३२ मनुष्यांचीबाजेगिरी । राक्षसांचीवोडंबरी । भगवंताचीनानापरी । विचित्रमाया ३३ हेसाचासारिखीचदिसे । विचारितांचिनिरसे । मिथ्याचपरीआभा से । निरंतर ३४ साचम्हणावीतरीहेनासे । मिथ्याह्मणावीतरीहेदिसे । दोहींपदार्थीअविश्वासे । सांगतांमन ३५ परंतुहेनव्हेसाचार । मायेचामिथ्याविचार । दिसतेंहेंस्वमाकार । जाणबापा ३६ तथापिअजूनतुज ला । भासचिसत्यवाटला । तरीयेथेंचुकापडिला । ऐकबापा ३७ दृश्यभासअविद्यात्मक । तुझाहिदेहतदात्मक । ह्मणोनिहाअविवेक । तेथेंसंचरला ३८ दृष्टीनेंदृश्यदेखिलें । मनभासावरीबैसलें । परीतेंलिंगदेहझालें । अ विद्यात्मक ३९ अविद्येनेंअविद्यादेखिली । ह्मणोनगोष्टीविश्वासली । तुझीकायाअवघीसंचली । अविद्येची । ४० तेंचिकायामीआपण । देहबुद्धीचेंलक्षण । येणेंकरितांझालेंप्रमाण । दृश्यअवघें ४१ इकडेसत्यमानि लादेह । तिकडेदृश्यसत्यहानिर्वाह । दोहींमध्येंमहासंदेह । पैसावलाबळें ४२ देहेंबुद्धिकेलीबळकट । आणिब्रह्म पाहोंगेलाधीट । तोंदृश्यानेंरोधिलीवाट । परब्रह्माची ४३ तेथेंसाचमानिलेंदृश्याला । निश्चयेंचिबाणोनिगेला । पाहाहोकेव्हडाचुकापडिला । अकस्मात ४४ आतांअसोहेंबोलणें । ब्रह्मनपाविजमीपणें । देहबुद्धीचींलक्षणें । दृश्यभाविती ४५ अस्थींच्यादेहींमांसाचागोळा । पाहेनम्हणेब्रह्मीचासोहळा । तोज्ञातानव्हेआंधळा । केवळमू र्ख ४६ दृष्टीसदिसेमनासभासे । तितुकेंकाळांतरींनासे । ह्मणोनिदृश्यातीतअसे । परब्रह्मतें ४७ परब्रह्मतें

१ माया- २ राक्षस. ३ राक्षसी माया. ४ काळनेमी या नांवें राक्षस ऋषीचें स्वरूप घेऊन कपटानें तप करणारा. ५ आश्चर्य.

शाश्वत । मायातेचिअशाश्वत । ऐसाबोलिलानिश्चितार्थ । नानाशास्त्रीं ४८ आतांपुढेंनिरूपण । देहबुद्धीचेंल
क्षण । चुकापडिलातोमीकोण । बोलिलेंअसे ४९ मीकोणहेंजाणावें । मीपणत्यागूनअनन्यव्हांवें । मगसमाधान
तेंस्वभावें । अंगींबाणे ५० । । इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेषष्ठदशकेदृश्यनिरसनंनामअष्टमःसमासः ८
श्रीगणेशायनमः । । गुप्तआहेउदंडधन । कायजाणतीसेवकजन । तयांसआहेतेंज्ञान । बाह्यात्काराचें १
गुप्तठेविलेंउदंडअर्थ । आणिप्रगटदिसतीपदार्थ । शाहणेशोधितीस्वार्थ । अंतरींअसे २ तैसेंदृश्यहेंमायिक । पा
हतअसतीसकळलोक । परीजयासठाउकाविवेक । तेअंतरजाणती ३ द्रव्यठेवूनजळसोडिलें । लोकह्मणतीस
रोवरभरलें । तयाचेंअभ्यंतरकळलें । समर्थजनासी ४ तैसेज्ञातेजेसमर्थ । तिहींवोळखिलापरमार्थ । इतरतेक
रितीस्वार्थ । दृश्यपदार्थांचा ५ काबाडीवाहतीकाबाड । श्रेष्ठभोगितीरत्नेंजोड । हेंजयाचेंत्यासगोड । कर्मयोगें
६ एककाष्ठस्वार्थकरिती । एकशुंभाएकवटिती । तैसेनव्हेकींनृपती । सारभोक्ते ७ जयांसआहेविचार । तेसु
खासनींझालेस्वार । इतरतेजवळीलभार । वाहातचिमेले ८ एकदिव्यान्नेंभक्षिती । एकविष्ठासांवडिती । आ
पणवर्तल्याचाघेती । साभिमान ९ सारसेविजेश्रेष्ठीं । असारघेइजेवृथापुष्टीं । सारासाराचीगोष्टी । सज्ञानजा
णती १० गुप्तपरीसचिंतामणी । प्रगटखडेकांचणी । गुप्तहेमरत्नखाणी । प्रगटपाषाणमृत्तिका ११ अव्हशं
खअव्हावेल । गुप्तवनस्पतीअमूल्य । एरंडधोत्रेबहुसाल । प्रगटशिंपी १२ कोठेंदिसेनाकल्पतरु । उदंडशेरां
चाविस्तारु । पाहतांनाहींमैलागरु । बोरीबाभळीउदंड १३ कामधेनुजाणिजेइंद्रें । सृष्टींतउदंडखिल्लारें । महद्भा
ग्यभोगिजेनृपवरें । इतरांकर्मानुसार १४ नानाव्यापारकरितीजन । अवघेचम्हणतीसकांचन । परंतुकुबेराचें
महिमान । कोणासीचनये १५ तैसाज्ञानीयोगीश्वर । गुप्तार्थलाभाचाईश्वर । इतरतेपोटाचेकिंकर । नानामतें
धुंडिती १६ तस्मात्सारतेंदिसेना । आणिअसारतेंदिसेजना । सारासारविवंचना । साधुजाणती १७ इतरां
सहेंकायसांगणें । खरेंखोटेंकोणजाणें । साधुसंतांचियेखुणें । साधुसंतजाणती १८ दिसेनाजेंगुप्तधन । तयास

१ नाशिवंत. २ आत्मज्ञानावांचून दुसरें कांहींच नाहीं तें अनन्य, ३ जग. ४ लांकूड. ५ गोवऱ्या. ६ राजा. ७ कल्पवृक्ष. ८ राजा.

करणेंलागेअंजन । गुप्तपरमात्मासज्जन । संगतींशोधावा १९ रायाचेसन्निधहोतां । सहजचिलाभेश्रीमंतता । तैसाहासत्संगधरितां । सद्वस्तुलाभे २० सद्वस्तूसलाभेसद्वस्तु । अन्यवस्थासिअन्यवस्तु । पाहताप्रशस्ता सिप्रशस्तु । विचारलाभे २१ म्हणोनिहेंदृश्यजात । अवघेंचिआहेअशाश्वत । परमात्माअच्युतअनंत । तोयादृ श्यावेगळा २२ दृश्यवेगळादृश्याअंतरीं । सर्वात्मातोचराचरीं । विचारपाहतांअंतरीं । निश्चयबाणे २३ संसारत्याग नकरितां । प्रपंचउपाधिनसांडतां । जनामध्येंसार्थकता । विचारेंचिहोय २४ हेंप्रचीतीचेंबोलणें । विवेकेंप्रची तबाणें । प्रचीतपाहतीलतेशाहणे । अन्यथानव्हे २५ प्रचीतआणिअनुमान । उधारआणिरोकडेंधन । मान सपूजाप्रत्यक्षदर्शन । यांसमहदंतर २६ पुढेंजन्मांतरींहोणार । होतोअवघाचउद्धार । तैसेंनव्हेसारासार । ता त्काळलाभे २७ तात्काळचिलाभहोतो । प्राणीसंसारींसुटतो । संशयअवघाचितुटतो । जन्ममरणांचा २८ याचिजन्मेंयेणेंचिकाळें । संसारींहोइजेनिराळें । मोक्षपाविजेनिश्चळें । स्वरूपाकारें २९ येगोष्टीसकरीअनुमा न । तोशीघ्रचिपावेलपतन । मिथ्यावदेलत्यासआण । उपासनेची ३० हेंयथार्थचिआहेबोलणें । विवेकेंशीघ्र चिमुक्तहोणें । असोनिकांहींचनसणे । जनामध्यें ३१ देवपदआहेनिर्गुणं । देवपदींअनन्यपण । हाचिअर्थपा हतांपूर्ण । समाधानबाणे ३२ देहींचविदेहहोणे । करूनकांहींचनकरणें । जीवन्मुक्तांचींलक्षणें । जीवन्मुक्तजाणती ३३ येरवींहेंखरेंनवाटे । अनुमानेंचिसंदेहवाटे । संदेहाचेंमूळतुटे । सद्गुरुवचनें ३४ । इतिश्रीदासबोधेगुरु शिष्यसंवादेषष्ठदशकेसारशोधननिरूपणंनामनवमःसमासः ९ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः । । समाधानपुसतांकांहीं । म्हणतीबोलिजेऐसेंनाहीं । तरीतेंकैसेंआहेसर्वही । मजनिरूपावें । १ मुक्यानेंगूळखादला । गोडीनयेसांगायाला । याचाअभिप्रायमजला । निरूपणकीजे २ अनुभवहिपुसों जातां । म्हणतीनयेकींसांगतां । तरीकोणापाशींपुसोंआतां । समाधान ३ जेतेअगम्यसांगती । नयेमाझियेप्रची ती । विचारबैसेमाझेचित्तीं । ऐसेंकरावें ४ एसेंश्रोतयाचेंउत्तर । याचेंकेंसंप्रत्युत्तर । निरूपिजेलतत्पर । होऊन

१ चांगली वस्तु. २ नाशिवंत. ३ जगत. ४ पुष्कळ फेर. ५ दुसऱ्या जन्मीं. ६ जलद. ७ निराकार. ८ वैराग्यशील. ९ साधु.

ऐका ५ जेंसमाधानाचेंस्थळ । कींतोअनुभवचिकेवळ । तेंचिस्वरूपप्रांजळं । बोलूनदावूं ६ जेंबोलासआ
कळेना । बोलिल्याविणहिकळेना । जथासकल्पितांकल्पना । हिंपुटीहोय ७ तेंजाणावेंपरब्रह्म । जेंवेदांचेंगु
ह्यपरमं । धरितांसंतसमागम । सर्वहिकळे ८ तेंचिआतांसांगिजेल । जेंसमाधानसखोल । ऐकअनुभवाचे
बोल । अनिर्वाच्यवस्तू ९ सांगतांनयेतेंसांगणें । गोडीकळायागुळदेणें । ऐसेंहेंसद्गुरुविणें । होणारनाहीं १०
सद्गुरुकृपाकळेत्यासी । जोशोधीलआपणाशीं । पुढेंकळेलअनुभवासी । आपेआपवस्तू ११ दृढकरूनियांबु
द्धी । आधींघ्यावीआपुलीशुद्धी । तेणेंलागेसमाधी । अकस्मात १२ आपुलेंमूळबरेंशोधितां । आपुलीतोंमायिक
वार्ता । पुढेंवस्तूचतत्वतां । समाधान १३ आत्माआहेसर्वसाक्षी । हेंबोलिजेपूर्वपक्षीं । जोकोणीसिद्धांतलक्षी
तोचिसाधू १४ सिद्धांतवस्तुलक्षूंजातां । सर्वसाक्षिणीतेअवस्था । आत्मात्याहूनपरता । अवस्थांतीत १५
पदार्थज्ञानजेव्हांसरे । द्रष्टाद्रष्टेपणेंनुरे । तेसमयींफुंजउतरे । मीपणाचा १६ जेथेंमुरालेंमीपण । तेचिअनुभ
वाचीखूण । अनिर्वाच्यसमाधान । याकारणेंबोलिजे १७ अत्यंतविचाराचेबोल । तरीतेमायिकचिफोल । शब्दा
सबाह्यसखोल । अर्थचिअवघा १८ शब्दाकरितांकळेअर्थ । पाहतांशब्दव्यर्थ । शब्दसांगेयथार्थ । परीआ
पणमिथ्या १९ शब्दकरितावस्तुभासे । वस्तुपाहतांशब्दनासे । शब्दफोलअर्थअसे । घनदाटपणें २० भूसाक
रितांधान्यनिपजे । धान्यघेऊनभूसटाकिजे । तैसाभूसशब्दजाणिजे । अर्थधान्य २१ पोंचटांमध्येंघनवट ।
घनवटींउडेपोंचट । तैसाशब्दहाफलगट । परब्रह्मीं २२ शब्दबोलूनिराहे । अर्थशब्दापूर्वींचआहे । याकारणेंन
साहे । उपमातयाअर्थासी २३ भूससांडूनकणघ्यावा । तैसावाच्यांशत्यागावा । कणलक्षांशलक्षावा । शुद्धस्वा
नुभवें । २४ दृश्यावेगळेंबोलिजे । त्यासवाच्यांशह्मणिजे । त्याचाअर्थतोजाणिजे । शुद्धलक्षांश । २५ । ऐसा
जोशुद्धलक्षांश । तोचिजाणावापूर्वपक्ष । स्वानुभवतोअलक्ष । लक्षिलानवचे २६ जेथेंमाळूनसांडिलेंनभा ।
जोअनुभवाचागाभा । ऐसातोहिउभा । कल्पितकेला २७ मिथ्याकल्पनेपासूनझाला । खरेपणकैसेंअसेलत्याला

१ स्पष्ट. २ दुःखी, खिन्न. ३ सांगण्यास कठीण. ४ जागृति. स्वप्न. सुषुप्ति. या तीन अवस्थांच्या पलीकडे राहाणारा. ५ पहाणारा.

ह्मणोनितेथेंअनुभवाला । ठावचिनाहीं २८ दुजेविणअनुभव । हेंबोलणेंचितोवाव । याकारणेंनाहींठाव । अनुभवासी २९ अनुभवेंत्रिपुटीउपजे । अद्वैतींद्वैतचिलाजे । ह्मणोनियांबोलणेंसाजे । अनिर्वाच्य ३० दिवसरजनीचेंपरिमित । करावयामूळआदित्यं । आदित्यगेलियाउर्वरितें । त्यासिकायह्मणावें ३१ शब्दमौनाचाविचार । व्हावयामूळओंकार । तोओंकारगेलियाउच्चार । कैसाकरावा ३२ अनुभवआणिअनुभविता । सकळयेमायेचिकरितां । तेमायामूळींचनसता । त्यासकायह्मणावें ३३ वस्तुएकआपणएक । ऐशीअसतीवेगळीक । तरीअनुभवाचाविवेक । बोलोंयेतांसुखें ३४ वेगळेपणाचीमाता । तेलटिकीवंध्येचीसुता । ह्मणूनियांअभिन्नता । मूळींचआहे ३५ अजन्माहोतांनिजला । तेणेंस्वप्नींस्वप्नदेखिला । सद्गुरूसिशरणगेला । संसारदुःखें ३६ सद्गुरुकृपेस्तव । झालासंसारवाव । ज्ञानझालियाठाव । पुसेअज्ञानाचा ३७ आहेतितुकेंनाहींझालें । नाहींनाहींपणेंनिमालें । आहेनाहींजाऊनउरलें । नसोनकाहीं ३८ शून्यत्वातीतशुद्धज्ञान । तेणेंझालेंसमाधान । ऐक्यरूपेंअभिन्न । सहजस्थितीं ३९ अद्वैतनिरूपणहोतां । निमालीद्वैताचीवार्ता । ज्ञानचर्चाबोलोंजातां । जागृतिआली ४० श्रोतींव्हावेंसावधान । अर्थीवालावेंमन । खुणेपावतांसमाधान । अंतरींकळे ४१ तेणेंजितुकेंज्ञानकथिलें । तितुकेंस्वप्नावरीगेलें । अनिर्वाच्यसुखउरलें । शब्दातीत ४२ तेथेंशब्देंविणऐक्यता । अनुभवनाअनुभावता । ऐसानिवांततोमागुता । जागृतिआला ४३ तेणेंस्वप्नींस्वप्नदेखिला । जागाहोऊनजागृतीसआला । तेथेंतर्ककुंठितजाहला । अंतनलगे ४४ यानिरूपणाचेंमूळ । केलेंचकरूंप्रांजळ । तेणेंअंतरींनिवळ । समाधानकळे ४५ तवशिष्येंविनविलें । जीहेंआतांनिरूपिलें । तरीपाहिजेबोलिलें । मागुतेंस्वामी ४६ मजकळायाकारण । केलेंचकरावेंनिरूपण । तेथीलजेकांनिजखूण । तेमजअनुभवावी ४७ अजन्मातोसांगकवण । तेणेंदेखिलाकैसास्वप्न । येथेंकैसेंनिरूपण । बोलिलेंआहे ४८ जाणोनिशिष्याचाआदर । स्वामीदेतीप्रत्युत्तर । तेंचिआतांअतितत्पर । श्रोतींयेथेंपरिसावें ४९ ऐकशिष्यासावधान । अजन्मातोतूंचिजाण । तुवांदे

१ निराकार ब्रह्म. २ जीव व ईश्वर. ३ रात्र. ४ आदितीचा पुत्र ह्मणून अदित्य ( सूर्य. ) ५ बाकी, शेष. ६ वांझ. ७ पुत्र.

खिलास्वप्नींस्वप्न । तोहिआतासांगतों ५० स्वप्नींस्वप्नाचाविचार । तोतूंजाणहासंसार । तेथेंतुवांसारासार । विचारकेला ५१ रिघोनिसद्गुरूसिशरण । काढूनशुद्धनिरूपण । याचीकरिसीऊगखूण । प्रत्यक्ष[1]आतां ५२ याचाचिघेतांअनुभव । बोलणेंतितुकेंहोतेंवाव । निवांतविश्रांतीचाठाव । तेतूंजाणजागृती ५३ ज्ञानगोष्टीचा गलबला । सरोनअर्थप्रगटला । याचाविचारघेतांआला । अंतरींअनुभव ५४ तुजवाटेहेजागृती । मजझालीअनुभवप्राप्ती । यानांवकेवळभ्रांती । फिटलीचनाहीं ५५ अनुभवअनुभवींविराला । अनुभवेंविणअनुभव आला । हाहिस्वप्नींचाचेइला । नाहींचबापा ५६ जागाझालियास्वप्नऊर्मी । स्वप्नींह्मणसीअजन्मातोमी । जागेपणेंस्वप्नऊर्मी । गेलीचनाहीं ५७ स्वप्नींबाटेजागेपण । तैसीअनुभवाचीखूण । आलीपरीतेंसत्यस्वप्न । भ्रमरूप ५८ जागृतियापलीकडे । तेंसांगणेंकेवींघडे । जेथेंधारणाचिमोडे । विवेकाची ५९ म्हणोनितेंसमाधान । बोलतांचिनयेअसेंजाण । निःशब्दाचीऐसीखूण । बोलखावी ६० ऐसेंआहेसमाधान । बोलतांचनयेजाण । इतुकेनवाणलीखूण । निःशब्दाची ६१ ॥ ॥ इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेषष्ठदशकेआनिर्वाच्यनिरूपणंनामदशमःसमासः १० ॥ ॥ छ ॥ ॥ शुभंभवतु ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

१ साक्षात्कार.







श्रीमणेशायनमः । । विद्यावंतांचापूर्वज । गजाननएकद्विज । त्रिनयनेंचतुर्भुज । परशुंपाणी १ कुबेरापा
सूनअर्थ । वेदांपासूनपरमार्थ । लक्ष्मीपासूनसमर्थ । भाग्यासीआले २ तैशीमंगळमूर्तीआद्या । तियेपासूनझा
लीसकळविद्या । तेणेंलाघवकविगद्या । सत्पात्रेंजाहलीं ३ तैशींसमर्थाचींलेंकुरें । नानाअलंकारींसुंदरें । मूळपु
रुषाचेंनिर्धारें । तैसेकवी ४ नमूंऐसियागणेंद्रा । विद्याप्रकाशपूर्णचंद्रा । जयाचेनबोधसमुद्रा । भरितेंदाटे ५
जोकर्तृत्वासआरंभ । मूळपुरुषमूळारंभ । जोपरात्परस्वयंभ । आदिअंतीं ६ तयापासूनभ्रमंदा । इच्छाकुमा
रीशारदा । आदित्यांपासूनगोदा । मृगजळवाहे ७ जेमिथ्याब्रह्मणतांचगोवीं । मायिकपणेंलाघवी । वक्तयासवे
डालावी । वेमळेपणें ८ जेद्वैताचीजननी । कींतेअद्वैताचीखाणी । मूळमायागवसणी । अनंतब्रह्मांडांची ९
कींतेऔदुंबरीवेळी । अनंतब्रह्मांडेंलगडली । मूळपुरुषाचीमाउली । दुहितारूपें १० वंदूंऐशीवेदमाता । आदि
पुरुषाचीजेसत्ता । आतांआठवीनसमर्था । सद्गुरूसी ११ जयाचेनिकृपादृष्टीं । होयआनंदाचीवृष्टी । तेणेंगुणें
सर्वसृष्टी । आनंदमय १२ कींतोआनंदाचाजनक । सायुज्यमुक्तीचानायक । कैवल्यपददायक । अनाथबंधू
१३ मुमुक्षूचातंकसुस्वर । करुणाघाहिजेअंबर । बोलेकृपेचाजळधरं । साधकांवरी १४ कींतेंभवार्णवींचें
तारूं । बोधेंपाविजेपैलपारू । महाआवर्तीआधारू । भाविकांसी १५ कींतोकाळाचानियंता । नानासंकटींसो
डविता । कींतेभाविकांचीमाता । परमस्नेहाळ १६ कींतोपरत्रींचाआधारु । कींतोविश्रांतीचाथारू । नातरीसुखा
चेंमाहेरू । सुखरूप १७ ऐसासद्गुरुपूर्णपणी । तुटेभेदाचीकडसणी । देहेंविणलोटांगणीं । तयाप्रभूसी १८
साधुसंतआणिसज्जन । वंदूनियांश्रोतेजन । आतांकथानुसंधान । साधधऐका १९ संसारहाचिदीर्घस्वप्न । लो
भेंवोसणतीजन । माझीकांतामाझेंधन । कन्यापुत्रमाझे २० ज्ञानसूर्यमावळला । तेणेंप्रकाशलोपला । अंध
कारेंपूर्णझाला । ब्रह्मगोळअवघा २१ नाहींसत्वाचेंचांदणें । कांहींमार्गनदिसेजेणें । सर्वभ्रांतीचेनिगुणें । आ
पेंआपनदिसे २२ देहबुद्धिअहंकार । निजलेघोरतीघोर । दुःखेंआक्रंदतीथोर । विषयसुखाकारणें २३ नि

१ गणपती. २ शंकर. ३ परशुराम. ४ मायेचें अतिक्रमण करणारा. ५ स्त्री. ६ सरस्वती. ७ सूर्य. ८ चातक नामें पक्षी. ९ मेघ.

जलेअसतांमेले । पुनःउपजतांचनिजणें । ऐसेआलेआणिगेले । बहुतलोक २४ निद्सुरेपणेंचिसैरावैरा । बह तींकेल्यायेरझोरा । नेणोनियांपरमेश्वरा । भोगिलेकष्ट २५ तयाकष्टांचेंनिरसन । व्हावयापाहिजेआत्मज्ञान । ह्मणोनिहेंनिरूपण । अध्यात्मग्रंथीं २६ सकळविद्येमध्येंसार । अध्यात्मविद्येचाविचार । दशमाध्यायींशार्ङ्गध र । भगवद्गीतेंतबोलिला २७ । । श्लोक । । आध्यात्मविद्याविद्यानांवादःप्रवदतामहम् । याकारणेंअद्वै तग्रंथ । अध्यात्मविद्येचापरमार्थ । पावावयातोचिसमर्थ । जोसर्वांगेंश्रोता २८ जयाचेंचंचळहृदय । तेणेंग्रं थसोडूंचिनय । सोडितांअलभ्यहोय । अर्थयेथींचा २९ जयासजोडलापरमार्थ । तेणेंपाहावाहाग्रंथ । अर्थ शोधितांपरमार्थ । निश्चयबाणे ३० जयासनाहींपरमार्थ । तयासनकळेयेथींचाअर्थ । नेत्रेंविणनिधानस्वार्थ । अंधासनकळे ३१ एकह्मणतीमराठेंकाये । हेंतोंभल्यानेंऐकोनये । तींमूर्खेंनेणतीसोये । अर्थान्वयांची ३२ लोहाचीमांदूसकेली । नानारत्नेंसांठविलीं । तीअभाग्यानेंत्यागिली । लोखंडह्मणोनी ३३ तैसीभाषाप्राकृ त । अर्थवादआणिसिद्धांत । नेणोनित्यागितीभ्रांत । मंदबुद्धीस्तव ३४ अहाचसांपडतांधन । त्यागकरणें मूर्खपण । द्रव्यघ्यावेंसांठवून । पाहोंचिनये ३५ परीसदेखिलाअंगणीं । मार्गींसांपडलाचिंतामणी । अ व्हावेळमहागुणी । कूपामध्यें ३६ तैसेंप्रकृतींअद्वैत । सुगमआणिसुप्रचीत । अध्यात्मलाभेंअकस्मात । तरी अवश्यघ्यावें ३७ नकरितांव्युत्पत्तीचाश्रम । सकळशास्त्रार्थहोयसुगम । सत्समागमाचेंवर्म । तेंहेंऐसेंअसे ३८ जेंव्युत्पत्तीनेंनकळे । तेंसत्समागमेंकळे । सकळशास्त्रार्थआकळे । स्वानुभवासी ३९ ह्मणोनिकार णसत्समागम । तेथेंनलगेव्युत्पत्तिश्रम । जन्मसार्थकाचेंवर्म । वेगळेंचिअसे ४० । । श्लोक । । भाषाभे दाश्चवर्ततेअर्थएकोनसंशयः । पात्रद्वयेयथाखाद्यंस्वादभेदोनविद्यते १ । । टी० । । भाषापालटेकांहीं । अर्थवायांजातनाहीं । कार्यसिद्धितेसर्वहीं । अर्थाचपासीं ४१ तथापिप्राकृताकरितां । संस्कृताचीसार्थकता । ये व्हवींत्यागुप्तार्था । कोणजाणे ४२ आतांअसोहेंबोलणें । भाषात्यागूनअर्थघेणें । उत्तमवेऊनत्यागकरणें । सा

१ स्वेच्छा. २ जाणें येणें. ३ ठेवा. ४ लोखंड. ५ पेटा ६ विहीर. ७ सुलभ. ८ तत्त्वज्ञान, ईश्वराची प्राप्ति. ९ सुलभ. १० साधुसंगति.

लीटरफळांच्या ४३ अर्थसारभाषापोंचट। अभिमानेंकरावीखटपट । नानाअहंतेनेंवाट। रोधिलीमोक्षाची ४४
शोधघेतांलक्षांशाचा । तेथेंआर्धींवाच्यांशकैंचा । अगाधमहिमाभगवंताचा । कळलापाहिजे ४५ मुकेपणाचें
बोलणें । हेंजयाचेंतोचिजाणें । स्वानुभवाचियेखुणें । स्वानुभवीपाहिजे ४६ अर्थजाणेआध्यात्माचा । ऐसा
श्रोतामिळेलकैंचा । जयासिबोलतांवाचेचा । हव्यासाचिपुरे ४७ परीक्षवंतापुढेंरत्न । ठेवितांहोयसमाधान ।
तैसेंज्ञानियापुढेंज्ञान। बोलावेंवाटे ४८ मायाजाळेंदुश्चितहोये । तेंनिरूपणींकामानये । संसारिकांकळेकाये ।
अर्थयेथींचा ४९ । श्लोक । व्यवसायात्मिकाबुद्धिरेकेहकुरुनंदन । बहुशाखात्ह्यनंताश्चबुद्धयोव्यवसायिनाम् १
। टीका । व्यवंसार्यीजोमलिन । त्यासिनकळेनिरूपण । येथेंपाहिजेसावधपण । अतिशयेंसी ५० नानारत्नेंना
नाणीं। दुश्चितपणेंघेतांहानी। परीक्षानेणतांप्राणी । ठकलातेथें ५१ तैसेंनिरूपणींजाणा। आहाचपाहातांकळे
ना । मराठेंचिउमजेना। काहींकेल्या ५२ जेथेंनिरूपणाचेबोल। आणिअनुभवाचीवोल । तेंसंस्कृतापरीसखो
ल । आध्यात्मश्रवण ५३ मायाब्रह्मवोळखावें । तयासअध्यात्मह्मणवें। तरीतेंमायेचेंजाणावें। स्वरूपआधीं
५४ मायासगुँणसाकार । मायासर्वविकार । मायाजाणिजेविस्तार। पंचभूतांचा ५५ मायादृश्यदृष्टीस
दिसे । मायाभासमनासभासे। मायाक्षणभंगुरनासे। विवेकेंपाहतां ५६ मायाअनेकविश्वरूप । मायाविष्णू
चेंस्वरूप । मायेचीसीमाअमुप । बोलिजेतितुकीथोडी ५७ मायाबहुरूपबहुरंग। मायाईश्वराचासंग । माया
पाहतांअभंग । अखिलवाटे ५८ मायासृष्टीचीरचना । मायाआपुलीकल्पना । मायातोडितांतुटेना। ज्ञानेंवि
ण ५९ ऐसीमायानिरूपिली । स्वल्पसंकेतेंबोलिली । पुढेंवृत्तिसावधकेली। पाहिजेश्रोतीं ६० पुढेंब्रह्म
निरूपण । निरूपिलेंब्रम्हज्ञान । जेणेंतुटेमायाभान । एकसरें ६१ । इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेसप्तमद
शकेमंगलाचरणनिरूपणंनामप्रथमःसमासः ॥ १ ॥ ॥ ॥ छ ॥ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥
श्रीगणेशायनमः । । ब्रह्मनिर्गुणनिराकार । ब्रह्मानिःसंगनिर्विकार । ब्रह्मासनाहींपारावार । बोलतीसाधू १

१ गभार. २ अभ्यास. ३ हे अर्जुन. ४ निश्चय व्यापारी. ५ बहुत. ६ कथन. ७ सत्वगुण. रजोगुण. व तमोगुण. या तीनगुणानींयुक्त.

ब्रह्मसर्वांसव्यापक । ब्रह्मअनेकींएक । ब्रह्मशाश्वतहाविवेक । बोलिलाशास्त्रीं २ ब्रह्मअच्युतअनंत । ब्रह्मस
दोदितसंत । ब्रह्मकल्पनेरहित । निर्विकल्प ३ ब्रह्मदृश्यावेगळें । ब्रह्मशून्यत्वानिराळें । ब्रह्मइंद्रियांच्यामेळें ।
चोजवेना ४ ब्रह्मदृष्टीसादिसेना । ब्रह्ममूर्खासिअसेना । ब्रह्मगुरुविणयेईना । अनुभवासी ५ ब्रह्मसकळां
हुनिथोर । ब्रह्माऐसेंनाहींसार । ब्रम्हसूक्ष्मअगोचर । ब्रह्मादिकांसी ६ ब्रम्हशब्दींऐसेंतैसें । बोलिजेत्याहूनिअ
नारिसें । परीतेंश्रवणअभ्यासें । पाविजेब्रह्म ७ ब्रम्हासनामेंअनंत । परीतेंब्रह्मनामातीत । ब्रह्मासहेदृष्टांत । देतां
नशोभती ८ ब्रह्मासारिखेंदुसरें । पाहतांकायआहेखरें । ब्रह्मींदृष्टांतउत्तरें । कदानसाहे ९ जेथेंवाचानिवर्त
ती । मनासनाहीं । ब्रह्मप्राप्ती । ऐसीबोलिलीश्रुती । सिद्धांतवचनीं १० कल्पनारूपमनपाही । ब्रह्मींकल्पनाचिना
हीं । ह्मणोनिहेंवाक्यकांहीं । अन्यथानव्हे ११ आतांमनासिजेंअप्राप्त । तेंकैसेनिहोईलप्राप्त । ऐसेंम्हणालतरीकृ
त्य । सद्गुरुविणनाहीं १२ भांडारगृहेंभरलीं । परीअसतीअडकलीं । हातासनयेतांकिली । सर्वहीअप्राप्त १३
तरीकिल्लीतेकवण । मजकरावीनिरूपण । ऐसाश्रोतापुसेखुण । वक्त्यासी १४ सद्गुरुकृपातेचिकिल्ली । जेणेंबु
द्धिप्रकाशली । द्वैतकपाटेंउघडलीं । एकसरा १५ तेथेंसुखअसेवाड । नाहींमनासिपवाड । मनेंविणकैवाड ।
साधनाचा १६ त्याचीमनाविणप्राप्ती । कींवासनेविणतृप्ती । तेथेंनचलेव्यूत्पत्ती । कल्पनेचि १७ तेंपरेहूनिप
र । मनबुद्धिअगोचर । संगसोडितांसत्वर । पाविजेतें १८ संगसोडावाआपुला । मगपाहावेंतयाला । अनुभवि
तांयाबोला । सुखावेलगा १९ आपणह्मणिजेमीपण । मीपणह्मणजेजीवपण । जीवपणह्मणिजेअज्ञान । संगज
डला २० सोडितांतयासंगासी । ऐक्यहोयनिःसंगासी । कल्पनेविणप्राप्तीसी । अधिकारऐसा २१ मीको
णऐसेंनेणिजे । तयानावअज्ञानबोलिजे । अज्ञानगेलियापाविजे । परब्रह्मतें २२ देहबुद्धीचेंथोरपण । परब्रह्मीं
नचलेजाण । तेथेंहोतसेनिर्वाण । अहंभावासी २३ उंचनीचनाहींपरी । रायारंकांएकचसरी । ज्ञात्यापुरुषअथ
वानारी । तरीएकचिपद २४ ब्राह्मणाचेंब्रह्मतेंसोंवळें । शूद्राचेंब्रह्मतेंवोवळें । ऐसेंवेगळेंआगळें । तेंथेअसेचि

१ वाक् पाणी पाद पायु उपस्थ इत्यादिक दहा इंद्रियें. २ वेद. ३ द्रव्य ठेवण्याचें स्थान. ४ उपदेश करणारा गुरु. ५ दरवाजा.

ना २५ उंचब्रह्मतेंरायासी । नीचब्रह्मतेंपरिवारांसी । ऐसाभेदतयापासीं । मूळींचनाहीं २६ सकळांसमिळो
नब्रह्मएक । तेथेंनाहींअनेक । रंकअथवाब्रह्मादिक । तेथेंचिजाती २७ स्वर्गमृत्युआणिपाताळ । तिहींलो
कींचेज्ञातेसकळ । सकळांसिमिळोनिएकचिस्थळ । विश्रांतीचें २८ गुरुशिष्यांएकचिपद । तेथेंनाहींभेदाभेद
परीयादेहाचासंबंध । तोडिलापाहिजे २९ देहबुद्धीच्याअंतीं । सकळांसिएकचिप्राप्ती । एकब्रह्मद्वितीयंना
स्ती । हेंश्रुतीचेंवचन ३० साधुदिसतीवेगळाले । परीतेस्वस्वरुपींमिळाले । अवघेमिळोनिएकचिझाले । दे
हातीतवस्तू ३१ ब्रह्मनाहींनवेंजुनें । ब्रह्मनाहींअधिकउणें । उणेंभावीलतेंसुणें । देहबुद्धा ३२ देहबुद्धी
चानिश्चय । करीसमाधानाचाक्षय । चुकेसमाधानसमय । देहबुद्धियोगें ३३ देहाचेंजेंथोरपण । तेंचिदेहबु
द्धीचेंलक्षण । मिथ्याजाणोनाविचक्षणें । निंदितीदेह ३४ देहपावेजंववरीमरण । तंववरीधरींदेहाभिमान । पुन्हां
दाखवीपुनरागमंन । देहबुद्धिमागुती ३५ देहाचेनिथोरपणें । समाधानासिआणिलेंउणें । देहपडेलकोण्यागु
णें । हेंहिकळेना ३६ हितआहेदेहातीत । ह्मणोनिनिरूपितीसंत । देहबुद्धीनेंअनांहित । होऊंचिलागे ३७
सामर्थ्यबळेंदेहबुद्धी । योगियांसतेंहिबाधी । देहबुद्धीचीउपाधी । पैसावोंलागे ३८ ह्मणोनदेहबुद्धिझडे । तरीच
परमार्थघडे । देहबुद्धीनेंविघडे । ऐक्यताब्रह्मींची ३९ विवेकवस्तुकडेवोढी । देहबुद्धितेथूनिपाडी । अहंतालावू
निनिवडी । वेगळेपणें ४० विचक्षणेंयाकारणें । देहबुद्धित्यजावीश्रवणें । सत्यब्रह्मींसाचारपणें । मिळोनजावें
४१ । सत्यब्रह्मतेंकवण । ऐसाश्रोताकरीप्रश्न । प्रत्युत्तरदेआपण । वक्ताश्रोतयासी ४२ ह्मणेब्रह्मएकचिअसे
परीतेंबहुविधाभासे । अनुभवदेहींअनारिसें । नानामतीं ४३ जेंजेंजयाअनुभवलें । तेंचितयासिमानलें । ते
थेंचित्याचेंविश्वासलें । अंतःकरण ४४ ब्रह्मनामरूपातीत । असोनिनामेंबहुत । निर्मळनिश्चळनिवांत । निजा
नंद ४५ अरूपअलक्षअगोचर । अच्युतअनंतअपार । अदृश्यअतर्क्यअपार । ऐसींनामें ४६ नादरूपज्यो
तिरूप । चैतन्यरूपसत्तारूप । स्वस्वरूपसाक्षरूप । ऐसींनामें ४७ शून्यआणिसनातन । सर्वेश्वरआणिसर्व

१ दुसरें. २ नाहीं. ३ वेद. ४ निराकार ब्रह्म. ५ साधु, ज्ञानी, वैराग्यशील. ६ गर्व. ७ पुनर्जन्म. ८ तत्वज्ञान. ९ अप्रिय.

ज्ञ । सर्वात्माजगज्जीवनं । ऐसींनामें ४८ सहजआणिसदोदित । शुद्धबुद्धसर्वातीत । शाश्वतआणिशब्दाती
त । ऐसींनामें ४९ विशाळविस्तीर्णविश्वंभर । विमळवस्तुव्योमाकार । आत्मापरमात्मापरमेश्वर । ऐसींनामें
५० परमात्माज्ञानघन । एकरूपपुरातन । चिद्रूपचिन्मात्रजाण । नामेंअनाम्याचीं ५१ ऐसींनामेंअसं
ख्यात । परीतोपरेशनामातीत । त्याचाकरावयानिश्चितार्थ । ठेविलींनामें ५२ तोविश्रांतीचाविश्राम । आदि
पुरुषआत्माराम । तेंएकचिपरब्रह्म । दुसरेंनाहीं ५३ तेंचिकळायाकारणें । चौदाब्रह्मांचींलक्षणें । सांगिजेती
तेणेंश्रवणें । निश्चयबाणें ५४ खोटेंनिवडितांएकसरें । उरलेंतेंजाणिजेस्वरें । चौदाब्रम्हेंशास्त्राधारें । बोलिजेती ५५
इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेसप्तमदशकेब्रह्मनिरूपणंनामद्वितीयःसमासः ॥ २ ॥ ॥छ॥ ॥छ॥



श्रीगणेशायनमः । । श्रोतींव्हावेंसावधान । आतांसांगतोंब्रम्हज्ञान । जेणेंहोयसमाधान । साधकांचें १ रत्नेंसा
धायाकारणें । मृत्तिकालागेएकवटणें । चौदाब्रह्मांचींलक्षणें । जाणिजेतैसीं २ पदार्थेंविणसंकेत । द्वैतावेगळादृ
ष्टांत । पूर्वपक्षेंविणसिद्धांत । बोलतांचिनये ३ आधींमिथ्याउभारावें । मगतेंबोलखोनसांडावें । पुढेंसत्यतेंस्व
भावें । अंतरींबाणे ४ ह्मणोनचौदाब्रह्मांचासंकेत । बोलिलाकळावयासिद्धांत । येथंश्रोतींसावचित्त । क्षणएक
असावें ५ पहिलेंतेंशब्दब्रह्म । दुजेंओमित्येकाक्षरंब्रह्म । तिसरेंखंब्रह्म । बोलिलीश्रुती ६ चौथेंजाणसर्वब्रह्म
पांचवेंचैतन्यब्रह्म । साहावेंसत्ताब्रम्ह । साक्षिब्रह्मसातवें ७ आठवेंसगुणब्रह्म । नववेंनिर्गुणब्रह्म । दाहावेंवाच्यब्र
ह्म । जाणावेंपैं ८ अनुभवतेंअक्रावें । आनंदब्रह्मतेंबारावें । तदाकारतेंतेरावें । चौदावेंअनिर्वाच्य ९ ऐसीं
हींचौदाब्रह्में । यांचींनिरूपिलींनामें । आतांस्वरूपाचींवर्मे । संकेतेंदावूं १० अनुभवेंविणभ्रम । यानांवश
ब्दब्रह्म । आतांओमित्येकाक्षरंब्रह्म । तेंएकाक्षर ११ खंशब्देंआकाशब्रह्म । महदाकाशव्यापकब्रह्म । आतांबो
लिजेलसूक्ष्मब्रह्म । सर्वब्रह्म १२ पंचभूतांचेंकुवेडें । जेंजेंतत्वदृष्टीसपडे । तेंतेंब्रह्मचिरोकडें । बोलिजेतआहे १३
यानांवसर्वब्रह्म । श्रुतिआश्रयाचेंवर्म । आतांचैतन्यब्रह्म । बोलिजेल १४ पंचभूतादिमायेतें । चैतन्यचिचेतवि



---

१ सर्व व्यापून राहाणारा ह्मणून सर्वात्मा. २ विश्वाचें पोषण करणारा ह्मणून जगज्जीवन. ३ आकाशाप्रमाणें सर्वत्र राहाणारा.

तें । म्हणोनियांचैतन्यातें । चैतन्यब्रह्मबोलिजे १५ चैतन्यासज्याचीसत्ता । तेंसत्ताब्रह्मतत्वतां । तयेसत्तेस
जाणता । यानांवसाक्षिब्रह्म १६ साक्षित्वजयापासूनी । तेंहिआकाळिलेंगुणीं । सगुणब्रह्महेवाणी । तयासि
वदे १७ जेथेंनाहींगुणवार्ता । तेंनिर्गुणब्रह्मतत्वतां । वाच्यब्रह्मतेंहिआतां । बोलिजेल १८ जेंवाचेबोल
तांआलें । तेंवाच्यब्रह्मबोलिलें । अनुभवासिकाथिलें । नवचेसर्वथा १९ यानांवअनुभवब्रह्म । आनंदवृत्तीचा
धर्म । परंतुयाचेंहिवर्म । बोलवेना २० ऐसेंहेंब्रह्मआनंद । तदाकारतेंअभेद । अनिर्वाच्यसंवाद । तुटोनि
गेला २१ ऐसींहींचौदाब्रह्में । निरूपिलींअनुक्रमें । साधकेंपाहतांभ्रमें । बोधिजेना २२ ब्रह्मजाणावेंशाश्वत ।
मायातेंचिशाश्वत । चौदाब्रह्मांचासिद्धांत । होईलआतां २३ शब्दब्रह्मतेंशाब्दिक । अनुभवेंविणमायिक । शा
श्वताचाविवेक । तेथेंनाहीं २४ जेथेंक्षरनाअक्षर । तेथेंकैचेंओमित्येकाक्षर । शाश्वताचाविचार । तेथेंनादिसे
२५ खंब्रह्मऐसेंवचन । तरीशून्यातेंनाशीज्ञान । शाश्वताचेंअधिष्ठान । तेथेंनादिसे २६ सर्वब्रांसहोतोअं
त । हेंतोंप्रगटचिदिसत । प्रळयबोलिलानिश्चित । वेदांतशास्त्रीं २७ ब्रह्मप्रळयमांडेलजेथें । भूतान्वयकैंचाते
थें । ह्मणोनियांसर्वब्रम्हातें । नाशआहे २८ अचळासिआणीचळण । निर्गुणासलावितांगुण । आकारासवि
चक्षण । मानीतना २९ जेंनिर्माणपंचभूत । तेंप्रत्यक्षनाशवंत । सर्वब्रह्महेमातें । घडेकेवीं ३० असोआ
तांहेंबहुत । सर्वब्रह्मनाशवंत । वेगळेपणासअंत । पाहणेंकैचें ३१ आतांजयासचेतवावें । तेंचिमायिकस्वभा
वें । तेथंचैतन्याच्यानावें । नाशआला ३२ परिवारेंविणसत्ता । तेसत्तानव्हेतत्वतां । पदार्थेंविणसाक्षता । तेहि
मिथ्या ३३ सगुणासनाशआहे । प्रत्यक्षासप्रमाणकाये । सगुणब्रम्हनिश्चयें । नाशवंत ३४ निर्गुणऐ
सेंजेंनांव । त्यानांवासकैंचाठाव । गुणेंविणगौरव । येईलकैचें ३५ मायाजैसेंमृगजळ । ऐसेंबोलतीसकळ ।
कांतेंकल्पनेचेंआभाळ । नाथिलेंची ३६ ग्रामोनास्तिकुतःसीमा । जन्मेंविणजीवात्मा । अद्वैतासिउपमा । द्वैता
ची ३७ मायेविरहितसत्ता । पदार्थाविणजाणता । अविद्येविणचैतन्यता । कोणासआली ३८ सत्ताचैत

१ साक्षात्कार. २ ऐक्यपणा. ३ पंचमहाभूतें. ४ आकृति. ५ ज्ञानी, साधु. ६ वार्ता, गोष्ट, वर्तमान. ७ साकार. ८ खोटें. ९ गांव.

न्यतासाक्षी । सर्वांहिगुणांचियेपाशीं । ठायींचेनिर्गुणत्यासी । गुणकैंचे ३९ ऐसेजेगुणरहित । तेथेंनामाचा
संकेत । तोचिजाणावाअशाश्वत । निश्चयेंसी ४० निर्गुणब्रम्हासिसंकेतें । नामेंठेविलींबहुतें । तेंवाच्यब्र
ह्मत्यातें । नाशआहे ४१ आनंदाचाअनुभव । हाहिवृत्तीचाचभाव । तदाकारींठाव । वृत्तीसनाहीं ४२
अनिर्वाच्यआकारणें । संकेतवृत्तीच्यागुणें । तयासंकेतासउणें । वृत्तीनेंआणिलें ४३ अनिर्वाच्यतेनिवृत्ती ।
तेचिउन्मनीचीस्थिती । निरूपाधिविश्रांती । योगियांची ४४ वस्तुजेकांनिरुपाधी । तेचिसहजसमाधी । जे
पैंतुटेआधिव्याधी । भंवदुःखाची ४५ जोउपाधीचाअंत । तोचिजाणावासिद्धांत । सिद्धांतआणिवेदांत । धा
दांतआत्मा ४६ असोऐसेंजेंशाश्वतब्रह्म । जेथेंनाहींमायाभ्रम । अनुभवीजाणेवर्म । स्वानुभवें ४७ आ
पुलेनिअनुभवें । कल्पनेसिमोडावें । मगसुकाळींपडावें । अनुभवाचे ४८ निर्विकल्पासिकल्पावें । कल्प
नामोडेस्वभावें । मगनसोनिअसावें । कल्पकोटी ४९ कल्पनेचेंएकबरें । मोहवितांचमोहरे । स्वरूपींघालि
तांभरें । निर्विकल्पीं ५० निर्विकल्पासकल्पितां । कल्पनेचीतुरेवार्ता । निःसंगासभेटोंजातां । निःसंगहोइजे
५१ पदार्थीऐसेंब्रह्मनव्हे । मातेंहातींधरूनिद्यावें । असोहेंअनुभवावें । सद्गुरुमुखें ५२ पुढेंकथेच्याअन्वयें
केलाचिकरूंनिश्चये । जेणेंअनुभवासये । केवळब्रह्म ५३ । । इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेसप्तमदशकेच
तुर्दशब्रह्मनिरूपणंनामतृतीयः समासः ॥ ३ ॥ ॥ ॥ छ ॥ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥
श्रीगणेशायनमः । । ब्रह्मनभाहूनिनिर्मळ । पाहतांतैसेंचिपोकळ । अरूपआणिविशाळ । मर्यादेवेगळें १
एकवीसस्वर्गसप्तपाताळ । मिळोनएकब्रह्मगोळ । ऐसेंअनंततेंनिर्मळ । व्यापूनअसे २ अनंतब्रह्मांडांखालतें ।
अनंतब्रह्मांडावरुतें । तेणेंविणस्थळरितें । अणुमात्रनाहीं ३ जळींस्थळींकाष्ठींपाषाणीं । ऐशीवदेलोकवाणी । ते
णेंविणरिताप्राणी । एकहिनाहीं ४ जळेंचरांसजैसेंजळ । बाह्यअभ्यंतरींनिखळ । तैसेंब्रह्महेंकेवळ । जीवमात्रां
सी ५ जळावेगळाठावआहे । ब्रम्हाबाहेरिजातांनये । म्हणोनिउपमानसाहे । जळाचीतया ६ आकाशाबा

१ ज्ञान. २ मनोदुःख व रोग. ३ संसार. ४ मोह. ५ विकल्परहित ६ आकाश. ७ मोडें. ८ ब्रह्मांड. ९ उदकांतील जीव.

हेरिपळोंजातां । पुढेंआकाशचितत्वतां । तैसातयाअनंता । अंतचिनाहीं ७ परीजेंअखंडभेटलें । सर्वांगासालि
गडिलें ॥ अतिनिकटपणींचोरलें । सकळांसिजें ८ तयामध्येंचिआसिजे । परीतयासिनेणिजे । उपजेभासनुप
जे । परब्रह्मतें ९ आकाशामध्येंआभाळ । तेणेंआकाशवाटेडहुळ । परीतेंमिथ्यानिवळ । आकाशचिअसे १०
न्याहारदेतांआकाशीं । चक्रेंदिसतीडोळ्याशीं । तैसेंदृश्यज्ञोनियांशी । मिथ्यारूप ११ मिथ्याचिपरीआभा
से । निद्रितासिस्वप्नजैसें । जागाझालियाआंपैसें । बुझोंलागे १२ तैसेंआपुलेनिअनुभवें । ज्ञानेंजागृतीसया
वें । मगमायिकेंस्वभावें । कळोंलागे १३ आतांअसोहेकुवाडे । जेंब्रह्मांडापैलीकडे । तेंचिआतांनिवाडें । उ
मजोनदावूं १४ ब्रह्मब्रह्मांडींकालवलें । पदार्थमात्रासिव्यापूनिठेलें । सर्वांमध्येंविस्तारलें । अंशमात्रें १५
ब्रह्मामध्येंसृष्टिभासे । सृष्टिमध्येंब्रह्मअसे । अनुभवघेतांआभासे । अंशमात्रें १६ अंशमात्रेंसृष्टिभीतरी ।
बाहेरिमर्यादाकोणकरी । सगळेंब्रह्मब्रह्मांडोदरीं । मायीलकैसें १७ आवृत्तिमध्येंआकाश । सगळेंसांठवतां
प्रयास । म्हणोनतयाचाअंश । बोलिजेतो १८ ब्रह्मजैसेंकालवलें । परीतेंनाहींहालवलें । सर्वांतपरीसंचलें ।
संचलेपणें १९ पंचभूतींअसेमिश्रित । परंतुतेंपंचभूतातीत । पंकींआकाशअलिप्त । असोनिजैसें २०
ब्रह्मासदृष्टांतनवडे । बुझावयादेणेंघडे । परिदृष्टांतींसाहित्यपडे । विचारितांआकाश २१ खंब्रह्मऐसीश्रुती ।
गगनदृशहेस्मृती । म्हणोनब्रम्हासदृष्टांतीं । आकाशवडे २२ काळिमानसतांपितळ । मगतेंसोनेंचिकेवळ ।
शून्यत्वनसतांनिर्मळ । आकाशब्रह्म २३ म्हणोनब्रह्मजैसेंगगन । आणिमायाजैसापवन । आढळेपरीदर्शन ।
नव्हेत्याचें २४ शब्दसृष्टीचीरचना । होतजातक्षणक्षणा । परंतुतेंस्थिरावेना । वायूचीऐसी २५ असोऐ
सीभायामायिक । शाश्वततेंब्रह्मएक । पाहोंजातांअनेक । व्यापूनअसे २६ पृथ्वीसिभेदूनिआहे । परीतेंब्रह्म
कठिणनव्हे । दुजिउपमानसाहे । तयामृदुत्वासी २७ पृथ्वीहूनिमृदुजळ । जळाहूनितोअनळ । अनळाहूनिको
मळ । वायुजाणावा २८ वायूहूनितेंमगन । अत्यंतचिमृदुजाण । गगनाहूनिमृदुपूर्ण । ब्रम्हजाणावें । वज्रा

१तत्व ज्ञानाचा अनुभव घेणारे तेज्ञानी. २ व्यर्थ. ३ आपोआप. ४ मायेनें उत्पन्न केलेलें तें मायिक. ५ अतिक्रमणकरून राहणारें.

स्रजसेमेदिळें । परीमृदुत्वनाहींगेलें । उपमेरहितसंचलें । कठिणनामृदु ३० पृथ्वीमध्येंव्यापूनिअसे । पृथ्वीनासे तेंननासे । जळेंशोषेतेंनशोषे । जळींअसोनी ३१ तेजींअसेपरीजळेना । पवनींअसेपरीचळेना । गगनींअसेप रीकळेना । परब्रह्मतें ३२ शरीरींअवघेंव्यापलें । परीतेंनाहींआढळलें । जवळींचदुरावलें । नवलकैसें ३३ सन्मुखाचिचहूंकडे । तयामध्येंपाहणेंघडे । बाह्याभ्यंतरींरोकडें । सिद्धचिआहे ३४ तयामध्येंचिआपण । आप णसबाह्यतेंजाण । दृश्यावेगळीखूण । गगनासारिखी ३५ कांहींनाहींसेंवाटलें । तेथेंचितेंकोंदाटलें । जैसेंनदिसे आपुलें । आपणासिधन ३६ जोजोपदार्थदृष्टीसपडे । तेंत्यापदार्थापैलीकडे । अनुभवेंहेंकुवाडें । उकलावें ३७ मागेंपुढेंआकाश । पदार्थेंविणजोपैस । पृथ्वीविणप्रकाश । एकरूप ३८ जेंजेंरूपआणिनाम । तोतोनाथिला चिभ्रम । नामरूपातीतवर्म । अनुभवीजाणती ३९ नभींधूम्राचेडोंगर । उचलतीथोरथोर । तैसेंदावीवोडंबरें । मायादेवी ४० ऐशीमायाअशाश्वत । ब्रह्मजाणावेंशाश्वत । सर्वांठायींसदोदित । भरलेंअसे ४१ पोथीवाचूं जातांपाहे । मातृकामध्येंभरलेंआहे । नेत्रींरिघोनियांराहे । मृदुपणें ४२ श्रवणेंशब्दऐकतां । मनेंविचारपाहता मनासबाह्यतत्वतां । परब्रम्हतें ४३ चरणेंचालतांमार्गीं । जेंआढळेसर्वांगीं । करेंघेतांवस्तुलागीं । आडवेंब्रम्ह ४४ असोइंद्रियसमुदाव । तयामध्येंवर्तेसर्व । जाणोंजातांमोडेहाव । इंद्रियांची ४५ जेंजवळींचअसे । पाहों जातांनदिसे । नदिसोनवसे । कांहींएक ४६ जेंअनुभवेंचिजाणावें । सृष्टीचेनिअभावें । आपुलेनिस्वानुभवें । पाविजेब्रम्ह ४७ ज्ञानदृष्टीचेंदेखणें । चर्मदृष्टीपाहोंनेणें । अंतरवृत्तीचियेखुणें । अंतरवृत्तीसाक्ष ४८ जाणेब्र ह्मजाणेमाया । जाणेअनुभवाच्याठाया । तेएकजणावीतुर्या । सर्वसाक्षिणी ४९ साक्षित्ववृत्तीचेंकारण । उन्म नीतेनिवृत्तिजाण । तेथेंविरेजाणपण । विज्ञानतें ५० जेथेंअज्ञानसरे । ज्ञानतेंहिनुरे । विज्ञानवृत्तिमुरे । परब्रम्हीं ५१ ऐसेंब्रह्मशाश्वत । जेथेंकल्पनेसिअंत । योगिजनाचाएकांत । अनुभवेंजाणावें ५२ । । इतिश्रीदास बोधेसप्तमदशकेगुरुशिष्यसंवादेविमलब्रह्मनिरूपणंनामचतुर्थःसमासः ॥ ४ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥



---

१ उदक, पाणी. २ वारा. ३ देह. ४ नाम व रूप यापासून निराळें. ५ पसारा. ६ नाशवंत. ७ निरंतर. ८ कानानीं. ९ पाय.

श्रीगणेशायनमः । । केवळब्रह्मजेंबोलिलें । तेंअनुभवासआलें । आणिमायेचेंलागलें । अनुसंधान १ ब्रम्ह
अंतरींप्रकाशे । आणिमायाहिप्रत्यक्षदिसे । आतांहेंद्वैतनिरसे । कवणेपरी २ तरीआतांसावधान । एकाग्रक
रूनियांमन । मायाब्रह्महेंकवण । जाणताहे ३ सत्यब्रह्माचासंकल्प । मिथ्यामायेचाविकल्प । ऐशियाद्वैताचा
जल्प । मनचिकरी ४ जाणेब्रह्मजाणेमाया । तेएकजाणावीतुर्या । सर्वजाणेह्मणोनियां । सर्वसाक्षिणी ५
ऐकतुर्येचेंलक्षण । जेथेंसर्वजाणपण । सर्वचिनाहींकवण । जाणेलगा ६ संकल्पविकल्पांचीसृष्टी । झालीमना
चियेपोटीं । तेंमनचिमिथ्याशेवटीं । साक्षीकवण ७ साक्षित्वचैतन्यसत्ता । हेगुणब्रह्माचियामाथां । आरोपले
जाणवृथा । मायागुणें ८ घटामठांचेनिगुणें । त्रिविधआकाशहेंबोलणें । मायेचेनिखरेपणें । गुणब्रह्मीं ९
जंवखरेपणमायेसी । तंवचिसाक्षित्वब्रह्मासी । मायाअविद्येचेनिरासी । द्वैतकैंचें १० ह्मणोनसर्वसाक्षिमन ।
तेंचिझालियाउन्मन । मगतुर्यारूपज्ञान । तेंमावळोनगेलें ११ जयासद्वैतभासलें । तेंमनउन्मनझालें । द्वैताद्वै
तांचेंतुटलें । अनुसंधान १२ एवंद्वैतआणिअद्वैत । होयवृत्तीचासंकेत । वृत्तिझालियानिवृत्त । द्वैतकैंचें १३
वृत्तिरहितजेंज्ञान । तेंचिपूर्णसमाधान । जेथेंतुटेअनुसंधान । मायाब्रह्मीचें १४ मायाब्रह्मऐसाहेतं । मनेंक
ल्पिलासंकेत । ब्रह्मकल्पनेरहित । जाणतीज्ञानी १५ जेंमनबुद्धिअगोचर । जेंकल्पनेहूनपर । तेंअनुभवितां
साचारं । द्वैतकैंचें १६ द्वैतपाहतांब्रह्मनसे । ब्रह्मपाहतांद्वैतनासे । द्वैताद्वैतभासे । कल्पनेसी १७ कल्पना
मायानिवारी । कल्पनाब्रह्मथावरी । संशयधरीआणिवारी । तेहिकल्पना १८ कल्पनाकरीबंधन । कल्पनादे
समाधान । ब्रह्मींलावीअनुसंधान । तेहिकल्पना १९ कल्पनाद्वैताचीमाता । कल्पनाज्ञप्तितत्वता । बद्धताआ
णिमुक्तता । कल्पनागुणें २० कल्पनाअंतरींसबळ । नसतेदावीब्रम्हगोळ । क्षणएकांतेंनिर्मळ । स्वरूपकल्पी
२१ क्षणएकधोकावाहे । क्षणएकस्थिरराहे । क्षणएकपाहे । विस्मितहोउनी २२ क्षणएकांतउमजे । क्ष
णएकनिर्बुजे । नानाविकारकरिजे । तेकल्पनाजाणावी २३ कल्पनाजन्माचेंमूळ । कल्पनाभक्तीचेंफळ । क

१ विचार, तर्क. २ तुर्यावस्था. ३ मठाकाश. घटाकाश. महाकाश. ४ ज्ञान. ५ इच्छा. ६ खरोखर. ७ आनंद. ८ जीव व ईश्वर हें द्वैत.

॥ ६ ॥ ॥ ५ ॥

ल्पनातेचिकेवळ। मोक्षदात्री २४ असोऐसीहेकल्पना । साधनेंदेसमाधाना । येऱ्हवींहेपतना । मूळींचकीं
२५ म्हणोनिसर्वांचेंमूळ । तेहेकल्पनाचिकेवळ। इचेंकेलियानिर्मूळ । ब्रह्मप्राप्ती २६ श्रवणआणिमनन
निजध्यासेंसमाधान। मिथ्याकल्पनेचेंभानें। उडोनिजाय २७ शुद्धब्रह्माचानिश्चय । करीकल्पनेचाजय। नि
श्चितार्थेंसंशय। तुटोनिजाय २८ मिथ्याकल्पनेचेकोडें। कैसेंराहेसाचेंपुढें । जैसेंसूर्याचेनिउजेडें । नासेतमँ
२९ तैसेंज्ञानाचेनिप्रकाशें। मिथ्याकल्पनाहेनासे। मगहेंतुटेआपैसें। द्वैतानुसंधान ३० कल्पनेनेंकल्पनाउ
डे। जैसामृगेंमृगसांपडे। कांशरेंशरंआतुडे। आकाशमार्गीं ३१ शुद्धकल्पनेचेंबळ। झालियानासेसबळ। हें
चिवचनप्रांजळ। सावधऐका ३२ शुद्धकल्पनेचीखुण। स्वयेंकल्पिजेनिर्गुण। स्वस्वरूँपींस्मरण । पडोंचिने
दी ३३ सदास्वरूपानुसंधान। करीद्वैताचेंनिरसन। अद्वैतनिश्चयाचेंज्ञान। तेचिशुद्धकल्पना ३४ अद्वैतकल्पी
तेंशुद्ध। द्वैतकल्पीतेंअशुद्ध। अशुद्धतेंचिप्रसिद्ध। सबळजाणावें ३५ शुद्धकल्पनेंचाअर्थ। अद्वैताचानिश्चितार्थ
आणिसबळतेंव्यर्थ। द्वैतकल्पी ३६ अद्वैतकल्पनाप्रकाशे। तेचक्षणींद्वैतनासे। द्वैतासरिसीनिरसे। सबळकल्प
ना ३७ कल्पनेनेंकल्पनासरे। ऐसेंजाणावेंचतुरें। सबळगेलियानंतरें। शुद्धउरली ३८ शुद्धकल्पनेचेंरूप । तें
चिकल्पीस्वरूप। स्वरूपकल्पितांतद्रूप। होयआपण ३९ कल्पनेसिमिथ्यात्वआलें। सहजचितद्रूपझालें। आ
त्मनिश्चयेंनाशिलें। कल्पनेसी ४० तेचिक्षणींनिश्चयचळे । तेचिक्षणींद्वैतउफाळे । जैसाअस्तमानींप्रबळे।
अंधकार ४१ तैसेंज्ञानहोतांमलिन । अज्ञानप्रबळेजाण । याकारणेंश्रवण । अखंडअसावें ४२ आतां
असोहेंबोलणेंझालें। आशंकाफेडूंएकाबोलें। जयासद्वैतभासलें। तेंतूनव्हेसीसर्वथा ४३ मागीलआशंकाफिट
ली। इतुकेनहेकथासंपली। पुढेंवृत्तिसावधकेली। पाहिजेश्रोतीं। ४४। । इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादे ॥ ६ ॥
सप्तमदशकेद्वैतकल्पनानिरसननिरूपणंनामपंचमःसमासः ॥ ५ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥
श्रीगणेशायनमः। । अद्वैतब्रह्मनिरूपिलें। जेंकल्पनेरहितसंचलें। क्षणएकतदाकारकेलें। मजयानिरूपणें १

१ मुक्ति देणारी. २ भास. ३ खऱ्या जवळ. ४ अंधार. ५ बाण. ६ स्पष्ट. ७ आत्मस्वरूपीं. ८ नाश. दूरीकरण.

परीस्यांतदाकारव्हावें । ब्रह्मचिहोऊनअसावें । पुनःसंसारांसनयावें । चंचळपणेंसर्वथा २ कल्पनेरहितजेंसुख
तेथेंनाहींसंसारदुःख । ह्मणोनितेंचिएक । होऊनअसावें ३ ब्रह्मचिहोइजेश्रवणें । पुन्हांवृत्तिवरीलागेयेणें । ऐसें
सदायेणें । चुकेनाकीं ४ मनेंअंतरींजावें । क्षणएकब्रह्मचिव्हावें । पुन्हांतेथूनकोसळावें । वृत्तिवरीमागुती ५
प्रत्यावृत्तिसैरावैरा । कितीकरूंयेरझारा । पायींलावूनियांदोरा । कीटकजैसा ६ उपदेशकाळींतदाकार । होतां
पडेहेंशरीर । अथवानेणेंआपपर । ऐसेंझालेंपाहिजे ७ ऐसेंनसतांजेंबोलगें । तेंचिवाटेलाजिरवाणें । ब्रह्महोऊ
नसंसारकरणें । हेंहिविपरीतदिसे ८ जोस्वयेंब्रह्मचिझाला । तोमागुताकैसाआला । ऐसेंज्ञानमाझेंमजला । प्र
शस्तनवाटे ९ ब्रम्हहोऊनजावें । कांतेंसंसारींचअसावें । दोहींकडेभरंगळावें । कितीह्मणोनी १० निरूपणीं
ज्ञानप्रबळे । उठोनजातांतेंमावळे । मागुताकामक्रोधखवळे । ब्रह्मरूपासी ११ ऐसाकैसाब्रह्मझाला । दोहींक
डेअंतरला । वोडगस्तपणेंचिगेला । संसारत्याचा १२ घेतांब्रह्मसुखाचीगोडी । संसारिकमागेंवोढी । संसारकरितां
आवडी । ब्रम्हींउपजे १३ ब्रम्हसुखनेलेंसंसारें । संसारगेलाज्ञानद्वारें । दोन्हींअपुरींपुरें । एकहिनाहीं १४ या
कारणेंमाझेंचित्त । चंचळझालेंदुश्चित । याकारणेंनिश्चितार्थ । एकहिनाहीं १५ ऐसाश्रोताकरीविनंती । आतां
राहावेंकोणेरीतीं । ह्मणेअखंडमाझीमती । ब्रह्माकारनाहीं १६ आतांयाचेंप्रत्युत्तर । वक्तादेईलसुंदर । श्रोतींव्हा
वेंनिरुत्तर । क्षणएकआतां १७ ब्रह्मचिहोऊनजेपडिले । तेचिमुक्तिपदासगेले । येरतेकायबुझाले । व्यासादिक
१८ श्रोताविनंतिकरीपुढती । शुकमुक्तवामदेववाहेश्रुती । दोघेचिमुक्तआदिअंतीं । बोलतअसे १९ वेदेंबद्धके
लेसर्व । मुक्तशुकवामदेव । वेदवचनींअभाव । कैसाधरावा २० ऐसाश्रोतावेदाधारें । देताझालाप्रत्युत्तरें ।
दोघेचिमुक्तअत्यादरें । प्रतिपाद्यकेले २१ वक्ताबोलेयाउपरी । दोघेचिमुक्तसृष्टिवरी । ऐसेंबोलतांउरी । को
णासआहे २२ बहुरूपीबहुमुनी । सिद्धयोगीआत्मज्ञानी । झालेपुरुषसमाधानी । असंख्यात २३ ॥ ॥
श्लोक ॥ ॥ पहादनारदपराशरपुंडरीकव्यासांबरीषशुकशौनकभीष्मदाल्भ्यान् ॥ रुक्मांगदार्जुनवासिष्ठविभीष

१. मातोश्रीच्या उदरामध्यें पुनःपुनःजन्म घेणें यास संसार असें ह्मणतात. २ स्वेच्छेनें. ३ जाणें येणें. ४ नष्ट होतें सबब यास शरीर हें नाव.

णादीन्पुण्यानिमान्परमभागवतान्स्मरामि १ कविर्हरिरंतरिक्षःप्रबुद्धःपिप्पलायनः ॥ आविर्होत्रोथद्रुमिलश्चम
सःकरभाजनः २ यांहिवेगळेथोरथोर । ब्रम्हाविष्णुमहेश्वर । आदिकरूनदिगंबर[1] । विदेहादिक[2] २४ शुकवाम
देवमुक्तझाले । येरेंहेअवघेचबुडाले । यावचनेंविश्वासले । तेपढतमूर्ख २५ तरीवेदकैसाबोलिला । तोकायतु
म्हींमिथ्याकेला । ऐकोनवक्तादेताझाला । प्रत्युत्तर २६ वेदबोलिलापूर्वपक्ष । मूर्खतेथेंचेलावीलक्ष । साधु
आणिव्युत्पन्नदक्ष । त्यांसहेंनमानें २७ तथापिहेंजरीमानलें । तरीवेदसामर्थ्यबुडालें । वेदाचेनिउद्धरिलें । नव
चेकोणा २८ वेदाअंगींसामर्थ्यनसे । तरीयावेदांसिकोणपुसे । म्हणोनिवेदींसामर्थ्यअसे । जनउद्धरावया २९
वेदाक्षरघडेज्यासी । तोबोलिजेपुंण्यराशी । ह्मणोनिवेदींसामर्थ्यासी । कायउणें ३० वेदशास्त्रपुराण । भाग्यें
झालियाश्रवण । तेणेंहोइजेपावन । हेंबोलतीसाधू ३१ श्लोकअथवाश्लोकार्ध । नाहींतरीश्लोकपाद । श्रवणहो
तांएकशब्द । नानादोषजाती ३२ वेदशास्त्रींपुराणीं । ऐशावाक्यांच्याअयनीं । अगाधमहिमाव्यासवाणी ।
वदोनिगेली ३३ एकाक्षरहोतांश्रवण । तात्काळचिहोइजेपावन । ऐसेंग्रंथाचेंमहिमान । ठायींठायींबोलिलें ।
३४ दोहींवेगळातिजानुद्धरे । तरीमहिमाकैंचाउरे । असोहेंजाणिजेचतुरें । येरांगाथागोवी ३५ वेदशास्त्रेंपुरा
णें । कैशींहोतीअप्रमाणें । दोघांवांचूनितिसराकोणें । उद्धरावा ३६ ह्मणतीकाष्ठहोऊनिपडिला । तोचिएक
मुक्तझाला । शुकतोहिअनुवादला । नानानिरूपणें ३७ शुकमुक्तऐसेंवचन । वेदबोलिलाहेंप्रमाण । परीतोनव्ह
ताअचेतन । ब्रह्माकार ३८ अचेतनब्रह्माकार । असतांशुकयोगीश्वर । तरीसारासारविचार । बोलणेंनघ
डे ३९ जोब्रह्माकारझाला । तोकाष्ठहोऊनपडिला । शुकभागवतबोलिला । परीक्षितीपुढें ४० निरूपणहें
सारासार । बोलिलापाहिजेविचार । धांडोळावेंचराचर । दृष्टांताकारणें ४१ क्षणएकब्रह्मचिन्हावें । क्षणएकदृश्य
धांडोळावें । नानादृष्टांतींसंपादावें । वक्तृत्वासी ४२ असोभागवतनिरूपण । शुकबोलिलाआपण । तयाअंगींब
द्धपण । लावूनयेकीं ४३ ह्मणोनिबोलतांचालतां । निचेष्टितपडिलेंनसतां । भक्तिलाभेसायुज्यता । सद्गुरुबोधें ४४

१ दिशा हेंच आहे वस्त्र ज्यांचें तेदिगंबर. ( नग्न ) २ जनक आदिकरून. ३ दुसरे लोक. ४ खोटा. ५ बोलणारा.

एकमुक्तएकनित्यमुक्त । एकजाणावेजीवन्मुक्त । एकयोगीविदेहमुक्त । समाधानीं ४५ सचेतनतेजीवन्मुक्त । अचे
तनतोविदेहमुक्त । दोहींवेगळेनित्यमुक्त । योगीश्वरजाणावे ४६ स्वरूपबोधेंस्तब्धता । तेजाणावीतटस्थता । तटस्थ
ताआणिस्तब्धता । हादेहसंबंध ४७ येथेंअनुभवासीचकारण । येरसर्वनिष्कारण । तृप्तिपावावीआपण । आपुल्या
स्वानुभवें ४८ कंठमर्यादजेविला । त्यासह्मणतीभुकेला । तेणेंदब्देंजाजावला । हेंतोंवडेना । स्वरूपींनाहींदेह
तेथेंकायसासंदेह । बद्धमुक्तऐसाभाव । विदेहाचकडे ५० देहबुद्धिधरूनचित्तीं । मुक्तब्रह्मादिकनव्हेती । तेथेंशुका
चीकोणगती । मुक्तपणाची ५१ मुक्तपणेंयेणेंचिबद्ध । मुक्तबद्धहेंअबद्ध । स्वस्वरूपस्वतःसिद्ध । बद्धनामुक्त ५२
मुक्तपणाचेपोटींशिळा । बांधतांजाइजेपाताळा । देहबुद्धीचीअर्गला । स्वरूपींनसंटे ५३ मीपणापासूनसुट
ला । तोचिएकमुक्तजाहला । मुकाअथवाबोलिला । तरीतोमुक्त ५४ जयासबाधावेंतेंवाव । तेथेंकैंचामुक्त
भाव । पाहोंजातांसकळवाव । गुणवार्ता ५५ । । श्लोक । । बद्धोमुक्तइतिव्याख्यागुणतोमेनवस्तुतः ।
गुणस्यमायामूलत्वान्नमेमोक्षोनबंधनम् १ । । टीका । । तत्वज्ञातापरमशुद्ध । तयासिनाहींमुक्तबद्ध । मु
क्तबद्धहाविनोद । मायागुणें ५६ जेथेंनामरूपहेंसरे । तेथेंमुक्तपणकैंचेंउरे । मुक्तबद्धहेंविसरे । विसरपणेंसी ।
५७ बद्धमुक्तझालाकोण । ऐसाश्रोताकरीप्रश्न । बाधकजाणावेंमीपण । धर्त्यासबाधी ५८ एवंहाअवघा
श्रम । अहंतेचाजाणभ्रम । मयातीतजोविश्राम । सेविलानाहीं ५९ असोबद्धताआणिमुक्तता । आलीकल्प
नेच्यामाथां । तेकल्पनातरीतत्वतां । साचआहे ६० ह्मणोनिहेंमृगजळ । मायानाथिलेंआभाळ । स्वप्नमिथ्या
तात्काळ । जागृतीसहोय ६१ स्वप्नींबद्धमुक्तझाला । तोजागृतीसनाहींआला । कैंचाकोणकायझाला । कांहीं
कळेना ६२ ह्मणोनमुक्तविश्वजन । जयांसझालेंआत्मज्ञान । शुद्धज्ञानेंमुक्तपण । समूळवाव ६३ बद्धमुक्त
हासंदेह । धरीकल्पनेचादेह । साधुसदानिःसंदेह । देहातीतवस्तू ६४ आतांअसोहेपुढती । पुढेंकळावेंकोणेरीतीं
तेंचिनिरूपणश्रोतीं । सावधपरिसावें ६५ । इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेसप्तमदशकेबद्धमुक्तनिरूपणं
नामषष्ठःसमासः ॥ ६ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः । ।वस्तूसिजरीकल्पावें । तरीतेंनिर्विकल्पस्वभावें । तेथेंकल्पनेच्यानावें । शून्याकार १ त
थापिकल्पूंजातां । नयेकल्पनेच्याहाता । वोळखीठायींनपडेचित्ता । भ्रंशपडे २ कांहींदृष्टीसनदिसे । नानामतें
हिनभासे । नभासेनदिसेकैसें । वोळखावें ३ पाहोंजातांनिराकार । मनासिपडेशून्याकार । कल्पूंजातांअंधका
र । भरलावाटे ४ कल्पूंजातांवाटेकाळें । परीतेंकाळेंनापिवळें । आरक्तनिळेंनाढवळें । वर्णरहित ६ ज्यास
वर्णव्यक्तीनसे । भासाहूनिअनारिसें । रूपचिनाहींकैसें । वोळखावें ६ नदिसतांवोळखण । कितीधरावीआप
ण । हेंतोंश्रमासीचकारण । होतअसे ७ जोनिर्गुणगुणातीत । जोअदृश्यअव्यक्त । जोअचिंत्यचिंतनातीत ।
परमपुरुष ८ श्लोक । अचिंत्याव्यक्तरूपायनिर्गुणायगुणात्मने । समस्तजगदाधारमूर्तयेब्रह्मणेनमः १
टीका । अचिंत्यतेंचिंतावें । अव्यक्तासआठवावें । निर्गुणासओळखावें । कोणेपरी ९ जेंदृष्टीसचिनपडे
जेंमनासहिनातुडे । तयाकैसेंपाहणेंघडे । निर्गुणासी १० असंगाचासंगधरणें । निरावलंबींवासकरणें । निः
शब्दासिअनुवादणें । कोणेपरी ११ अचिंत्यासिचिंतूंजातां । निर्विकल्पासिकल्पितां । अद्वैताचेंध्यानकरितां ।
द्वैतचिउठे १२आतांध्यानाचिसांडावें । अनुसंधानतेंमोडावें । तरीमागुतेंपडावें । महासंशयीं १३ द्वैताच्या
भेणेंअंतरीं । वस्तुनपाहिजेतरी । तेणेंसमाधानउरी । कदाअसेचिना १४ सवेंलावितांसवेंघडे । सवेंपडतांव
स्तुआतुडे । नित्यानित्यविचारेंघडे । समाधान १५ वस्तुचिंतितांद्वैतउपजे । सोडीकरितांकांहींनुमजे । शून्य
त्वेंसंदेहींपडिजे । विवेकेंविण १६ ह्मणोनिविवेकधरावा । ज्ञानेंप्रपंचसांडावा । अहंभाववोसरावा । परी
तोवोसरेना १७ परब्रह्मतेंअद्वैत । कल्पितांचउठेद्वैत । तेथेंहेतुआणिदृष्टांत । कांहींचनचले १८ तेंआठ
वितांविसरिजे । कांतेंविसरोनआठविजे । जाणोनियांनेणिजे । परब्रह्मतें १९ त्यासनभेटतांहोयभेटी । भेटों
जातांपडेतुटी । ऐशीहेनवलगोष्टी । मुकेपणाची २० तेसाधूंजातांसाधवेना । नातरीसोडितांसुटेना । लागला
संबंधतुटेना । निरंतर २१ तेंअसताचिसदाअसे । नातरीपाहतांदुराशे । नपाहतांप्रकाशे । जेथेंतेथें २२ जेथेंअ

१ चिंतन करण्यास कठीण. २ दृष्टीस न दिसणारें. ३ निराकार. ४ गुणाला चैतन्य देणारें. ५ आश्रया वांचून. ६भय. ७ बाकी.

पायंतोचिउपाय । आणिउपायतोचिअपाय । हेंअनुभवेंविणकाय । उमजोंजाणे २३ तेंनुमजतांचिउमजे । उमजोनकांहींचनुमजे । तेवृत्तिविणपाविजे । निवृत्तिपद २४ तेंध्यानींधरितांनये । चिंतनींचिंतावेंतेंकाये । म नामध्येंनसमाये । परब्रह्मतें २५ त्यासउपमेद्यावेंजळ । तरीतेंनिर्मळनिश्चळ । विश्वबुडालेंसकळ । परीतें कोरडेंचिअसे २६ नव्हेप्रकाशासारखें । अथवानव्हेकाळोखें । आतांतेंकासयासारिखें । सांगावेंहो २७ ऐसेंब्रह्मनिरंजनें । कदानव्हेदृश्यमान । लावावेंतेंअनुसंधान । कोणेपरीं २८ अनुसंधानलावूंजातां । कांहींनाहींवाटेआतां । नेणेमनाचियेमाथां । संदेहवाजे २९ लटिकेंचिकायपाहावें । कोठेंजाऊनराहावें । अभावघेतलाजीवें । सत्यस्वरूपाँचा ३० अभावचिह्मणोंसत्य । तरीवेदशास्त्रकैसोंमिथ्य । आणिव्यासादि कांचेंकृत्य । वावुगेंनव्हे ३१ ह्मणोनिमिथ्याह्मणतांनय । बहुतज्ञानाचेउपाय । बहुतींनिर्मिलेंतेंकाय । मि थ्याह्मणावें ३२ अद्वैतज्ञानाचाउपदेश । गुरुगीतातोमहेश । सांगतांहोयपार्वतीस । महाज्ञान ३३ अव धूतगीताकेली । गोरक्षासनिरूपिली । तेअवधूतगीताबोलिली । ज्ञानमार्ग ३४ विष्णुहोऊनराजहंस । वि धीसकेलाउपदेश । तेहंसगीताजगदीश । बोलिलास्वमुखें ३५ ब्रह्मनारदातेंउपदेशित । चतुःश्लोकीभागवत । पुढेंव्यासमुखेंबहुत । विस्तारलें ३६ वासिष्ठसारवसिष्ठऋषी । सांगताझालारघुनाथासी । कृष्णसांगेअर्जुना सी । सप्तश्लोकीगीता ३७ ऐसेंसांगावेंतेंकिती । बहुतऋषिबोलिलेबहुतीं । अद्वैतज्ञानआदिअंतीं । सत्यचि असे ३८ ह्मणोनमिथ्याआत्मज्ञान । ह्मणतांपाविजेपतन । प्रज्ञेरहितजेजन । तयांसहेंकळेना ३९ जेथें शेषाचीप्रज्ञामंदली । श्रुतीसमौनमुद्रापडिली । जाणपणेंनचेवदली । स्वरूपस्थिती ४० आपणासनुमजेबर वें । म्हणोनिमिथ्याकैसेंकरावें । नातरीसदृढधरावें । सद्गुरुमुखें ४१ मिथ्यातेंचिसत्यझालें । सत्यअसोनिमि थ्याकेलें । संदेहसागरींबुडालें । अकस्मातमन ४२ मनासकल्पायाचीसवें । मनेंकल्पिलेंतेंनव्हे । तेणेंगुणेंसं देहधांवे । मीपणाचेनिपंथें ४३ तरीतोपंथचिमोडावा । मगपरमात्माजोडावा । समूळसंदेहतोडावा । साधु

१ विघ्न, संकट. २ उपाधिरहित. ३ चैतन्य स्वरूप. ४ महान् ह्मणजे मोठा असा जो ईश ह्मणजे स्वामी तो महेश ( शंकर. )

चेंनिसंगतीं ४४ मीपणशस्त्रेंतुटेना । मीपणफोडितांफुटेना । मीपणसोडितांसुटेना । कांहींकेल्या ४५
मीपणेंवस्तुनाकळे । मीपणेंभक्तिमावळे । मीपणेंशक्तिगळे । वैराग्याची ४६ मीपणेंप्रपंचनघडे । मीपणेंपरमा
र्थबुडे । मीपणेंसकळहिउडे । यशकिर्तिप्रताप ४७ मीपणेंमैत्रीतुटे । मीपणेंप्रीतिआटे । मीपणेंलिंगटे । अ
भिमानअंगीं ४८ पीपणेंविकल्पउठे । मीपणेंकलहसुटे । मीपणेंसंमोहफुटे । ऐक्यतेचा ४९ मीपणको
णांसीचनसाहे । तेंभगवंतींकैसेंनिसाहे । ह्मणूनमीपणसांडूनराहे । तोचिसमाधानी ५० मीपणकैसेंत्यागावें ।
ब्रह्मकैसेंअनुभवावें । समानकैसेंपावावें । कोण्याप्रकारें ५१ मीपणजाणोनत्यागावें । ब्रह्महोऊनअनुभवा
वें । समाधानतेंपावावें । निःसंगपणें ५२ आणिकएकसमाधान । मीपणेंविणसाधन । करूंजाणेंतोचिधन्य ।
समाधानी ५३ मीब्रह्मचिझालोंस्वतां । साधनकोणकरीलआतां । ऐसेंमनींकल्पूंजातां । कल्पनाचिउठे ५४
ब्रह्मींकल्पनानसाहे । तेंचितेथेंउभीराहे । तयेसीशोधूनिपाहे । तोचिसाधू ५५ निर्विकल्पासिकल्पावें । परीक
ल्पिलेंतेंआपणनव्हावें । मीपणासत्यागावें । येणेंरीतीं ५६ ब्रह्मविद्येच्यालपणीं । कांहींचनव्हावेंअसोनी ।
दक्षआणिसमाधानी । तोचिहेंजाणें ५७ जयासआपणकल्पावें । तेंचिआपणस्वभावें । येथेंकल्पनेच्यानावें ।
शून्यआलें ५८ पदींहूनचळोंनये । करावेंसाधनउपायें । तरीचसांपडेसोये । अलिप्तपणाची ५९ राजारा
ज्यपदींअसतां । उगीचचालेसर्वसत्ता । साध्यचिहोऊनतत्वतां । साधनकरावें ६० साधनआलेंदेहाच्यामाथा
आपणदेहनव्हेसर्वथा । ऐसाकरूनअकर्ता । सहजचिआहे ६१ देहआपणऐसेंकल्पावें । तरीचसाधनत्यागावें ।
देहातीतअसतांस्वभावें । देहकैंचा ६२ नातेंसाधननातेंदेह । आपणआपलानिःसंदेह । देहींचअसोनविदेह ।
स्थितिऐशी ६३ साधनेंविणब्रह्महोतां । लागोंपाहेदेहममता । आळसप्रबळेतत्वतां । ब्रह्मज्ञानामिसें ६४
परमार्थामिसेंआळसजाणे । ध्यानामिसेंनिद्रालागे । मुक्तिमिसेंदोषभागे । अनर्गळता ६५ निरूपणमिसेंनिंदा
घडे । संवादमिसेंविवादपडे । उपाधिमिसेंयेऊनजडे । अभिमानअंगीं ६६ तैसाब्रह्मज्ञानामिसें । आळसअं

१ लागतो. २ चित्ताची एकाग्रता. ३ दुसऱ्याच्या हिता विषयीं जो तत्पर त्यास साधु असें ह्मणतात. ४ निःसंशयी. ५ निःसंशयी.

तरींप्रवेशे । ह्मणेसाधनाचेंपिसें । कायकरावें ६७ । ॥ श्लोक । ॥ किंकरोमिक्वगेच्छामिकिंगृण्हामित्यजामिकिं । आत्मनापूरितंसर्वंमहाकल्पांबुनायथा १ । ॥ वचनआधारींलाविलें । जैसेंशस्त्रफिरविलें । स्वतांहाणोनिघेतलें । जयापरी ६८ तैसाउपायाचाउपाय । विपरीतपणेंस्वहितजाय । साधनसोडितांहोय । मुक्तपणेंबद्ध ६९ साधनकरितांसिद्धपण । हातींचेंजाईलनिघोन । तेणेंगुणेंसाधन । करूंचनावडे ७० लोकह्मणतीहासाधक । हेंचिलज्जावाटेएक । साधनकरितीब्रह्मादिक । हेंठाउकेंनाहीं ७१ आतांअसोहेअविद्या । अभ्याससारिणीविद्या । अभ्यासेंपाविजेआद्या । पूर्णब्रह्म ७२ आम्यासकरावाकवण । ऐसाश्रोतांकरीप्रश्न । परमार्थाचेंसाधन । बोलिलेंपाहिजे ७३ याचेंउत्तरश्रोतयांशी । दिधलेंपुढिलियेसमासीं । निरूपिलेंसाधनासी । परमार्थाच्या ७४ । ॥ इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेसप्तमदशकेसाधनप्रतिष्ठानिरूपणंनामसप्तमःसमासः ॥ ७ ॥

श्रीगणेशायनमः । ॥ ऐकपरमार्थाचेंसाधन । जेणेंहोयसमाधान । तेंतूंजाणगाश्रवण । निश्चयेंसी १ श्रवणेंआतुडेभक्ती । श्रवणेंउद्भवेविरक्ती । श्रवणेंतुटेआसक्ती । विषयांची २ श्रवणेंघडेचित्तशुद्धि । श्रवणेहोयदृढबुद्धी । श्रवणेंतुटेउपाधी । अभिमानाची ३ श्रवणेंनिश्चयघडे । श्रवणेंममतामोडे । श्रवणेंअंतरींजडे । समाधान ४ श्रवणेंआशंकाफिटे । श्रवणेंसंशयतुटे । श्रवणेंहोतांपालटे । पूर्वगुणआपुला ५ श्रवणेंआवरेमन । श्रवणेंघडेसमाधान । श्रवणेंतुटेबंधन । देहबुद्धीचें ६ श्रवणेंमीपणजाय । श्रवणेंधोकानय । श्रवणेंनानाअपाय । भस्महोती ७ श्रवणेंहोयकार्यसिद्धी । श्रवणेंलागेसमाधी । श्रवणेंघडेसर्वसिद्धी । समाधानाची ८ सत्संगावरीश्रवण । तेणेंकळेनिरूपण । श्रवणेंहोइजेआपण । तदाकार ९ श्रवणेंप्रबोधवाढे । श्रवणेंप्रज्ञाचढे । श्रवणेंविषयांचेवोढे । तुटोनिजाती १० श्रवणेंविचारकळे । श्रवणेंज्ञानहेंप्रबळे । श्रवणेंवस्तुनिवळे । साधकांसी ११ श्रवणेंसद्बुद्धिलागे । श्रवणेंविवेकजागे । श्रवणेंमनहेंमागे । भगवंतासी १२ श्रवणेंकुसंगतुटे । श्रवणेंकामवोहटे । श्रवणेंधोकाआटे । एकसरां १३ श्रवणेंमोहनासे । श्रवणेंस्फूर्तिप्रकाशे । श्रवणेंसद्वस्तुभासे । निश्चयात्मक

१ काय करूं. २ कोठें जाऊं. ३ काय ग्रहण करूं. ४ काय टाकूं. ५ माया, अज्ञान. ६ अनादि. जुनें. ७ श्रवण करणारा.

१४ श्रवणेंहोयउत्तमगती । श्रवणेंआतुडेशांती । श्रवणेंपाविजेनिवृत्ती । अचेळपद १५ श्रवणाऐसेंसारना
हीं । श्रवणेंघडेसर्वकांहीं । भवनदीच्याप्रवाहीं । तरणोपायश्रवणें १६ श्रवणभजनाचाआरंभ । श्रवणसर्वी
सर्वारंभ । श्रवणेंहोयस्वयंभ । सर्वकांहीं १७ प्रवृत्तिअथवानिवृत्ती । श्रवणेंविणनघडेप्राप्ती । हेतोंसकळांसप्र
चीती । प्रत्यक्षआहे १८ ऐकिल्याविणकळेना । हेंठाउकेंआहेजना । त्याकारणेंमूळप्रयत्ना । श्रवणआधीं १९
जेंजन्मींऐकिलेंचिनाहीं । तेथेंपडिजेसंदेहीं । म्हणोनियांदुजेंकांहीं । साम्यतानघडे २० बहुतसाधनेंपाहतां ।
श्रवणासनघडेसाम्यता । श्रवणेंविणतत्वतां । कार्यनचले २१ नदेखतांदिनकर । पडेअवघाअंधकार । श्रव
णेंविणप्रकार । तैसाहोय २२ कैसीनवविधाभक्ती । कैसीचतुर्विधामुक्ती । कैसीआहेसहजस्थिती । हेंश्रव
णेंविणनकळे २३ नकळेषट्कर्माचरण । नकळेकैसेंपुरश्चरण । नकळेकैसेंउपासन । विधियुक्त २४
नानाव्रतेंनानादानें । नानातपेंनानासाधनें । नानायोगतीर्थाटणें । श्रवणेंविणनकळती २५ नानाविद्यापिंडदा
न । नानातत्वांचेंशोधन । नानाकळाब्रम्हज्ञान । श्रवणेंविणनकळे २६ अठराभारवनस्पती । एक्याजळेंप्रबळ
ती । एक्यारसेंउत्पत्ती । सकळजीवांची २७ सकळजीवांएकपृथ्वी । सकळजीवांएकरवी । सकळजीवांवर्त
वी । एकवायू २८ सकळजीवांएकपैस । जयासबोलिजेआकाश । सकळजीवांचावास । एकपरब्रह्मीं २९ तै
सेंसकळजीवांसमिळोन । सारएकाचिसाधन । तेंहेंजाणश्रवण । प्राणिमात्रांसी ३० नानादेशभाषामतें । भू
मंडळींअसंख्यातें । सर्वांसश्रवणापरतें । साधनचिनाहीं ३१ श्रवणेंघडेउपरती । बद्धाचेमुमुक्षुहोती । मुमुक्षूंचे
साधकअर्ती । नेंमेंसिचालती ३२ साधकांचेहोतीसिद्ध । अंगींबाणतांप्रबोध । हेंतोंआहेप्रसिद्ध । सकळांसठा
उकें । ठायींचेखळचांडाळ । तेचिहोतीपुंण्यशीळ । ऐसाहागुणतात्काळ । श्रवणाचा ३४ जोदुर्बुद्धिदुरा
त्मा । तोचिहोयपुंण्यात्मा । अगाधश्रवणाचामहिमा । बोलिलानवचे ३५ तीर्थव्रतांचीफळश्रुती । पुढेंहोणारसां
गती । तैसेंनव्हेहातीच्याहातीं । सप्रचीतश्रवणें ३६ नानारोगनानाव्याधी । तात्काळतोडिजेऔषधीं ।



१ प्राप्तहोते. २ स्थिर. ३ संसार. ४ सूर्य. ५ श्रवण कीर्तन इत्यादिक. ६ सलोकता, समीपता आदिकरून.

तैसीआहेश्रवणसिद्धी । अनुभवीजाणती ३७ श्रवणाचाविचारकळे । तरीचभाग्यश्रीप्रबळे । मुख्यपरमात्माआ
कळे । स्वानुभवासी ३८ यानांवजाणावेंमनन । अर्थालागींसावधान । निदिध्यासेंसमाधान । होतअसे
३९ बोलिल्याचाअर्थकळे । तरीचसमाधानमिळे । अकस्मातअंतरींबोळे । निःसंदेह ४० संदेहेंजन्माचेंमूळ
तेंश्रवणेहोयनिर्मूळ । पुढेंसहजचिप्रांजळ । समाधान ४१ जेथेंनाहींश्रवणमनन । तेथेंकैचेंसमाधान । मुक्तप
णाचेंबंधन । जेंडेंलपायीं ४२ मुमुक्षुसाधकअथवासिद्ध । श्रवणेंविणतोबद्ध । श्रवणमननेंशुद्ध । चित्तवृत्तिहोय
॥ ४३ ॥ जेथेंनाहींनित्यश्रवण । तेंजाणावेंविलक्षण । तेथेंसाधकेंएकक्षण । क्रमूंनयेसर्वथा ४४ जेथेंनाहींश्रवण
स्वार्थ । तेथेंकैंचाहोपरमार्थ । मागेंकेलेंतितुकेंव्यर्थ । श्रवणेंविणहोय ४५ तस्मात्श्रवणकरावें । साधनमनींध
रावें । नित्यनेमेंतरावें । संसारसागरीं ४६ सेविलेंचिसेवावेंअन्न । घेतलेंचिघ्यावेंजीवन । तैसेंश्रवणमनत ।
केलेंचकरावें ४७ श्रवणाचाअनादर । आळसकरीजोनर । त्याचाहोयअपहार । स्वहिताविषयीं ४८ आ
ळसाचेंसंरक्षण । परमार्थाचीबुडवण । याकारणेंनित्यश्रवण । केलेंचिपाहिजे ४९ आतांश्रवणकैसेंकरावें ।
कोण्यापंथासपावावें । पुढिलियेसमासींआघवें । सांगिजेल ५० इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेसप्तमदश
केश्रवणनिरूपणंनामअष्टसःसमासः ८ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ
श्रीगणेशायनमः आतांश्रवणकैसेंकरावें । तेंहीसांगिजेलस्वभावें । श्रोतींअवधानद्यावे । एकचित्तें ॥ १ ॥
एकवक्तृत्वश्रवणींपडे । तेणेंझालेंसमाधानमोडे । केलानिश्चयविघडे । अकस्मात २ तेंवक्तृत्वत्यागावें । जेंमायि
कस्वभावें । तेथेंनिश्चयाच्यानावें । शून्याकार ३ एक्याग्रंथेंनिश्चयकेला । तोदुजयानेंउडविला । तेणेंसंशयचि
वाढला । जन्मवरी ४ जेथेंसंशयतुटती । होयआशंकानिवृत्ती । अद्वैतग्रंथपरमार्थी । श्रवणकरावे ५ जोमो
क्षाचाअधिकारी । तोपरमार्थपंथधरी । प्रीतिलागलीअंतरीं । अद्वैतग्रंथाची ६ जेणेंसांडिलाइहलोक । जोपर
लोकींचासाधक । तेणेंपाहावाविवेक । अद्वैतशास्त्रीं ७ जयासपाहिजेअद्वैत । तयापुढेंठेवितांद्वैत । तेणेंक्षोभलें

१ सांपडतो. २ हृदय. ३ संशय ४ स्पष्ट.५ समुद्र. ६ पाणी. ७ नाश. ८ सर्व. ९ लक्ष, वित्त. १० भाषण. ११ कान. १२ खोटें.

उठेचित्त । श्रोतयांचें ८ आवडीसारिखेंमिळे । तेणेंसुखचिउचंबळे । नाहींतरीकंटाळे । मानंसएकतां ९ ज्याचीउपासनाऐसी । त्यासिप्रीतिवाढेतैसी । तेथेंवर्णितांदुजयासी । प्रशस्तनवाटे १० प्रीतीचेंलक्षणऐसें । अंतरींउठेअनायासें । पाणीपाणवाटेजैसें । आपणचियांवे ११ तैसाजोआत्मज्ञानीनरातयासनावडेइतर । तेथेंपाहिजेसारासार । विचारणाते १२ तेथेंकुळदेवीभगवती । तेथेंपाहिजेसप्तशती । इतरदेवांचीस्तुती । कामानयेसर्वथा १३ घेतांअनंताच्याव्रता । तेथेंनलागेभगवद्गीता । साधुजनासिवार्ता । फळाशेचीनाहीं १४ वीरकंकणवालितां नाकीं । परितेशोभापावेनाकीं । जेथीलतेथेंआणिकीं । कामानयेसर्वथा १५ नानामाहात्म्येंबोलिलीं । जेथीलतेथेंवंद्यंझालीं । विपरीतकरूनवाचिलीं । तरीतेंविलक्षण १६ मल्लारिमाहात्म्यद्वारकेसी । द्वारकामाहात्म्यनेलेंकाशीसी । काशीमाहात्म्यव्यंकटेशीं । शोभानपावे १७ ऐसेंसांगतांअसेवाड । परीजेथीलतेथेंचिगोड । तैसीज्ञानियांसचाड । अद्वैतग्रंथाची १८ योगियांपुढेंआरोहण । परीक्षवंतांपुढेंपाषाण । पंडितापुढेंडफगाण । शोभानपावे १९ वेदज्ञापुढेंजती । निस्पृहापुढेंफळश्रुती । ज्ञानियापुढेंपोथी । कोकशास्त्राची २० ब्रह्मचर्यापुढेंनाचणी । रासक्रीडानिरूपणी । राजहंसापुढेंपाणी । ठेविलेंजैसें २१ तैसेंअंतार्निष्ठांपुढें । ठेविलेंशृंगारिदीपडें । तेणेंत्याचेंकैसेंवडे । समाधान २२ रायासरंकाचीआशा । तक्रसांगणेंपीयूषा । संन्याशासवोवसा । उच्छिष्टचांडाळीचा २३ कर्मनिष्ठावशीकरण । पंचाक्षरीयानिरूपण । तेथेंभंगेअंतःकरण । सहजचियाचें २४ तैसेपारमार्थिकजन । तयांसनसतांआत्मज्ञान । ग्रंथवाचितांसमाधान । होणारनाहीं २५ आतांअसोहेंबोलणें । जयासस्वहितकरणें तेणेंसदाविवरणें । अद्वैतग्रंथीं २६ आत्मज्ञानीएकचित्त । तेणेंपाहणेंअद्वैत । एकांतस्थळींनिवांत । समाधान २७ बहुतप्रकारेंपाहतां । ग्रंथनाहींअद्वैतापरता । परमार्थासितत्वतां । तारूंचकीं २८ इतरजेप्रापंचिक । हास्यविनोदनवरसिक । हितनव्हेतेंपुस्तक । परमार्थासी २९ जेणेंपरमार्थवाढे । अंगींअनुतापचढे । भक्तिसाधनआवडे । त्यानांवग्रंथ ३० जोऐकतांचगर्वेंगळे । कांतेभ्रांतीचमावळे । नातरएकसरेंवोळे । मनभगवंतीं

---

१ चित्त. २ दुसरें. ३ पूज्य. ४ आवड, प्रीति. ५ ब्रह्मानिष्ठ. ६ दरिद्र. ७ अमृत ८ उष्टं. ९ महार. १० परमार्थ स्वरूपीं आसक्त होणारे

३१ जेणेंहोयउपरंती । अवगुणंअवघेपालटती । जेणेंचुकेअधोगती । त्यानावग्रंथ ३२ जेणेंवारिष्टचडे । जेणेंपरोपकारघडे । जेणेंविषयवासनामोडे । त्यानावग्रंथ ३३ जेणेंपरत्रेंसाधन । जेणेंग्रंथेंहोयज्ञान । जेणेंहो इजेपावन । त्यानावग्रंथ ३४ ग्रंथबहुतअसती । नानाविधानेंफळश्रुती । जेथेंनुपजेविरक्ती । तोग्रंथचिनव्हे ३५ मोक्षेंविणफळश्रुती । तेदुराशेचीपोथी । एकतांएकतांपुढती । दुराशावाढे ३६ श्रवणींलोभउपजेल जेथें । विवेककैंचाअसेलतेथें । बैसलींदुराशेवींभूतें । तयाअधोगती ३७ एकोनीचफळश्रुती । पुढेंतरीपावों ह्मणती । तयाजन्मअधोगती । सहजचिजाहली ३८ नानाफळेंपक्षीखाती । तणेंचितयांहोततृप्ती । परीत्याच कोरांचेचित्तीं । अमृतवसे ३९ तैसेसंसारीमनुष्य । पाहेसंसाराचावास । परीजेभगवंताचेअंश । तेभगवंत इच्छिती ४० ज्ञानियांसपाहिजेज्ञान । भजकासपाहिजेभजन । साधकासपाहिजेसाधन । इच्छेसारिखें । ४१ परमार्थ्यासपाहिजेपरमार्थ । स्वार्थ्यासपाहिजेस्वार्थ । कृपणासपाहिजेअर्थ । मनापासूनी ४२ यो गियासपाहिजेयोग । भोगियासपाहिजेभोग । रोगीयासपाहिजेरोग । हरतीमात्रा ४३ कवीसपाहिजेप्रबंध । तार्किकासपाहिजेतर्कवाद । भाविकाससंवाद । गोडवाटे ४४ पंडितांसपाहिजेव्युत्पत्ती । विद्वानांसअध्ययन प्रीती । कळावंतांआवडती । नानाकळा ४५ हरिदासांआवडेकीर्तन । शुचिर्भूतांससंध्यास्नान । कर्मनिष्टांवि धिविधान । पाहिजेतें ४६ प्रेमळासपाहिजेकरुणा । दक्षतापाहिजेविचक्षणा । चातुर्यपाहिजेशाहाणा । आद रेंसी ४७ भक्तपाहेमूर्तिध्यान । संगीतपाहेताळज्ञान । रागज्ञानीतानमान । मूर्च्छनापाहे ४८ योगाभ्या सींपिंडज्ञान । तत्वज्ञानीतत्वज्ञान । नाडिज्ञानीमात्राज्ञान । पाहतसे ४९ कामिकपाहेकोकशास्त्र । चेटकीपाहे चेटकमंत्र । यंत्रीपाहेनानायंत्र । आदरेंसी ५० टवाळासिआवडेविनोद । उन्मत्तासनानाछंद ॥ तामसासअ प्रमाद ॥ गोडवाटे ५१ मूर्खहोयनादलुब्धी । निंदकपाहेउणीसंधी । पापीपाहेपापबुद्धी । लावूनअंगीं ५२ एकांपाहिजेरसाळ । एकांपाहिजेपाल्हाळ । एकांपाहिजेकेवळ । साबडीभक्ती ५३ आगमीपाहेआगम । शूर

१ वैराग्य. २ दोष. ३ नरकवास. ४ परलोकीं. ५ मिळतनाहीं. ६ विषय तृष्णा. ७ चकोर नामें पक्षी. ८ द्रव्य. ९ विषयी लोक.

पाहेसंग्रामं । एकपाहतीनानाधर्म । इच्छेसारिखे ५४ मुक्तपाहेमुक्तलीला । सर्वज्ञपाहेसर्वज्ञकळा । ज्योतिषीभ
विष्यपिंगळा । वर्णूपाहे ५५ ऐसेंसांगवेंतेंकिती । आवडीसारिखेंऐकती । नानापुस्तकेंवाचिती । सर्वकाळ ५६
परीपरत्रसाधनेंविण । ह्मणोनयेतेंश्रवण । जेथेंनाहींआत्मज्ञान । तयानांवकर्मणुक ५७ गोडीविणगोडपण
नाकेंविणसुलक्षण । ज्ञानेंविणनिरूपण । बोलोंचिनये ५८ आतांअसोहेंबहुत । ऐकावापरमार्थग्रंथ । परमार्थ
ग्रंथेंविणव्यर्थ । गाथागोवी ५९ म्हणोनिनित्यानित्यविचार । जेथेंबोलिलासारासार । तोचिग्रंथपैलपार । पा
ववीविवेकें ६० इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेसप्तमदशकेश्रवणनिरूपणंनामनवमःसमासः ॥ ९ ॥ ॥ ॥
श्रीगणेशायनमः । । मिथ्यातेंचिझालेंसत्य । सत्यतेंचिझालेंअसत्य । मायाविभ्रमाचेंकृत्य । ऐसेंअसेपाहतां १
सत्यकळावयाकारणें । बोलिलींनानानिरूपणें । तरीउठेनाधरणें । असत्याचें २ असत्यअंतरींबिंबलें । नसांग
तांतेंदृढझालें । सत्यअसोनहरपलें । जेथीलतेथें ३ वेदशास्त्रेंपुराणेंसांगती । सत्याचानिश्चयकरिती । तरीनये
आत्मप्रचीती । सत्यस्वरूप ४ सत्यअसोनआच्छादलें । मिथ्याअसोनसत्यझालें । ऐसेंविपरीतवर्तलें ।
देखतदेखतां ५ ऐसीमायेचीकरणी । कळोंआलीतत्क्षणीं । संतसंगेंनिरूपणीं । विचारघेतां ६ मांगांझालें
निरूपण । देखिलेंआपणासिआपण । तेणेंबाणलीखूण । परमार्थाची ७ तेणेंसमाधानझालें । चि
त्तचैतन्यींमिळालें । निजरूपेंबोळखिलें । निजवस्तूसी ८ प्रारब्धेंटाकिलासंदेहो । बोधेंफिटलासंदेहो । आ
तांचिपडोअथवाराहो । मिथ्याकलेवर ९ ज्ञानियांचेंजेंशरीर । तेंमिथ्यात्वेंनिर्विकार । जेथेंपडेतेंचिसार । पु
ण्यभूमी १० साधुदर्शनेंपावनतीर्थ । पुरतीत्यांचेमनोरथ । साधुनयेतांजिणेंव्यर्थ । तयापुण्यक्षेत्राचें ११ पु
ण्यनदीचेंजेंतीर । तेथेंपडावेंहेंशरीर । हाइतरजनांचाविचार । साधुतोचिनित्यमुक्त १२ उत्तरायणतेंउत्तम ।
दक्षिणायनतेंअधम । हासंदेहींवसेभ्रम । साधुतोनिःसंदेही १३ शुक्लपक्षउत्तरायण । गृहींदीपदिवामरण ।
अंतींराहवेंस्मरण । गतिकारणें १४ इतुकेंनलगेयोगियासी । तोजिताचिमुक्तपुण्यराशी । तिळांजलीपापपु

१ युद्ध. २ परलोकीं. ३ भ्रमण. ४ अंतःकरण. ५ तत्वज्ञान. ६ झांकलें. ७ आत्मस्वरूप. ८ तत्वज्ञान. ९ शरीर.

ण्यांशीं । दीधलीतेणें १५ देहाचाअंतबराआला । देहसुखरूपगेला । त्यासम्हणतीधन्यझाला । अज्ञानजन १६ जनाचेंविपरीतमत । अंतींभेटतोभगवंत । ऐसेंकल्पूनघात । करितीआपुलास्वयें १७ जितांसार्थकना हींकेलें । व्यर्थआयुष्यनिघोनगेलें । मूळींधान्यचिनाहींपेरिलें । तेंउगवेलकैंचें १८ जरीकेलेंईश्वरभजन । त रीतोहोइजेपावन । जैसेंवेव्हारितांधान्य । राशीमाथालाभे १९ दीधल्याविणपाविजेना । पेरिल्याविणउगवेना ऐसेंहेंवाक्यजना । ठाउकेंचिआहे २० नकरितांसेवेच्याव्यापारा । स्वामीसह्मणणेंकोठेंमुशारा । तैसेंअंतींअभक्त नरा । स्वहितनघडे २१ जितांनाहींभगवद्भक्ती । मेल्याकैंचीहोईलमुक्ती । असोजेजेजैसेंकरिती । तेतेपावतीतैसें २२ एवंनकरितांभगवद्भजन । अंतींनहोइजेपावन । जरीआलेंबरवेंमरण । तरीभक्तिविणअधोगती २३ ह्मणोनसाधूनेंआपुलें । जीतअसतांचसार्थककेलें । शरीरकारणींलाविलें । धन्यत्यांचें २४ जेकांजीवन्मुक्तप्राणी त्यांचेंशरीरपडोरानीं । अथवापडोश्मशानीं । तरीधन्यझाले २५ साधूचादेहदुःखितपडला । अथवाश्वानां दिकींभक्षिला । हेंप्रशस्तनवाटेमनाला । मंदबुद्धीस्तव २६ अंतबरानव्हेचिह्मणोन । कष्टीहोतीइतरजन । परी तेबापुडेअज्ञान । नेणतीवर्म २७ जोजन्मलाचिनाहींठायींचा । त्यासमृत्युयेईलकैंचा । विवेकबळेंजन्ममृत्यूंचा । घोंटभरिलाजेणें २८ स्वरूपानुसंधानबळें । सगळीमायानाढळे । तयाचापारनकळे । ब्रह्मादिकांसी २९ तोजिताचिअसतांमेला । मरणासमारूनव्याला । जन्ममृत्यूनस्मरेत्याला । विवेकबळें ३० तोजनींदिसतोपरी वेगळा । वर्तताभासेनिराळा । दृश्यैपदार्थत्यानिर्मळा । स्पर्शीलाचिनाहीं ३१ असोऐसेसाधुजन । त्यांचेंवड लियाभजन । तेणेंभजनेंपावन । इतरजनहोती ३२ सद्गुरूचाजोअंकितसाधक । तेणेंकेलाचकरावाविवेक । विवेककेलियातर्क । पुढेंनिरूपणीं ३३ हेंचिसाधकासीनिरवणें । अद्वैतप्रांजळनिरूपणें । तुमचेंहिसमाधानबा णें । साधूचऐसें ३४ जोसंतांसशरणगेला । तोसंतचिहोऊनठेला । इतरजनाउपयोगाआला । कृपाळूपणें । ३५ ऐसेंसंतांचेंमाहिमान । संतसंगेंहोतेंज्ञान । सत्संगापरतेंसाधन । आणिकनाहीं ३६ गुरुभजनाचेनि

१ मनुष्य. २ मुक्त. ३ नरकवास. ४ ईश्वराचे सेवेस. ५ कुत्रा. ६ दुसरे. ७ डोळ्यांस प्रत्यक्ष दिसणारा. ८ दास, सेवक. ९ विचार.

धीरें । निरूपणाचेंनिविचारें । क्रियाशुद्धनिर्धारें । पाविजेपद ३७ परमार्थाचेंजन्मस्थान । तेंचिसद्गुरूचेंभजन ।
सद्गुरुभजनेंसमाधान । अकस्मातबाणे ३८ देहमिथ्याजाणोनिजीवें । याचेंसार्थकचिकरावें । भजनभावेंतो
षवावें । चित्तसद्गुरूचें ३९ शरणांगताचीवाहेचिंता । तोएकसद्गुरुदाता । जैसेंबाळकवाढवीमाता । नानायत्नें
करूनी ४० । । यस्यदेवेपराभक्तिर्यथादेवेतथागुरौ । । म्हणोनसद्गुरूचेंभजन । जयासघडेतोचिधन्य । सद्गुरु
विणसमाधान । आणिकनाहीं ४१ सरलीशब्दाचीखटपट । आलाग्रंथाचाशेवट । तेथेंसांगीतलेंस्पष्ट । सद्गुरु
भजन ४२ सद्गुरुभजनापरतेंकांहीं । मोक्षदायकदुसरेंनाहीं । जयासनमनेंतेंही । अवलोकावीगुरुगीता ४३
तेथेंनिरूपिलेंबरवें । पार्वतीप्रतिसदाशिवें । याकारणेंसद्भावें । सद्गुरुचरणसेवावे ४४ जोयेग्रंथींचाविवेक । वि
वंचूनपाहेसाधक । तयाससांपडेएक । निश्चयज्ञानाचा ४५ ज्याग्रंथींबोलिलेंअद्वैत । तोह्मणूंनयेप्राकृत । स
त्यजाणावावेदांत । अर्थाविषयीं ४६ प्राकृतेंवेदांतकळे । सकळशास्त्रींपाहतांमिळे । आणिसमाधाननिवळे ।
अंतर्यामीं ४७ तेंप्राकृतह्मणोंनय । तेथेंज्ञानाचाउपाय । मूर्खासिहेंकळेकाय । मर्कटानारिकेळंजैसें ४८
आतांअसोहेंबोलणें । अधिकारपरत्वेंघेणें । शिंपीमधीलमुक्तउणें । ह्मणोनये ४९ जेथेंनेतिनेतिश्रुती । तेथें
नचलेभाषाव्युत्पत्ती । परब्रम्हआदिअंतीं । अनिर्वाच्य ५० ॥ ॥ इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेसप्तमदशके
देहातीतनिरूपणंनामदशमःसमासः ॥ १० ॥ ॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

१ कर्म. २ निश्चय. ३ मोक्ष. ४ ज्यापुरुषाची. ५ जसी. ६ तसी, ७ शोधून. ८ तत्वज्ञान. ९ वानर. १० नारळ. ११ मोतीं. १२ वेद.





श्रीगणेशायनमः । । श्रोतींव्हावेंसावध । विमळज्ञानबाळबोध । गुरुशिष्यांचासंवाद । अतिसुगमपरियेसा १
नानाशास्त्रेंधांडोळितां । आयुष्यपुरेनासर्वथा । अंतरींसंशयाचीव्यथा । वाढोंचिलागे २ नानातीर्थेंथोरथोरें । सृ
ष्टिमध्येंअपारें । सुगमेंदुर्गमेंदुष्करें । पुण्यदायकें ३ ऐसींतीर्थेंसर्वहिकरी । ऐसाकोणरेसंसारीं । फिरेंजातां
जन्मवरी । आयुष्यपुरेना ४ नानातपेंनानादानें । नानायोगनानासाधनें । हींसर्वहिदेवाकारणें । करिजेतआ
हे ५ पावावयादेवाधिदेवा । बहुविधश्रमकरावा । तेणेंदेवठायींपडावा । हेंसर्वमत ६ पावावयाभगवंतातें ।
नानापंथनानामतें । तयादेवाचेंस्वरूपतें । कैसेंआहे ७ बहुतदेवसृष्टिवरी । त्यांचीगणनाकोणकरी । एकदेव
कोणेंपरी । ठायींपडेना ८ बहुविधउपासना । ज्याचीजेथेंपुरेकामना । तोतेथेंचिराहिलामना । सदृढकरूनी
९ बहुदेवबहुभक्त । इच्छाझालेअसक्त । बहुऋषिबहुमत । वेगळाले १० बहुनिवडितांनिवडेना । एकनि
श्चयवडेना । शास्त्रेंभांडतीपडेना । निश्चयठायीं ११ बहुतशास्त्रींबहुतभेद । मतामतांसिविरोध । ऐसाकरितां
विवाद । बहुतगेले १२ सहस्रांमध्येंकोणीएक । पाहेदेवाचाविवेक । परीत्यादेवाचेंकौतुक । ठायींनपडे १३ ठा
यींनपडेऐसेंह्मणतां । तेथेंचिलागलीअहंता । देवराहिलापरता । अहंतागुणें १४ आतांअसोहेंबोलणें । नाना
योगज्याकारणें । तोदेवकोण्यागुणें । ठायींपडे १५ देवकोणासह्मणावें । कैसेंतयासजाणावें । तेंचिबोलणेंस्व
भावें । बोलिजेल १६ जेणेंकेलेंचराचर । केलेसृष्टयादिव्यापार । सकळकर्तानिरंतर । नामजयाचे १७ जे
णेंकेल्यामेघमाळा । चंद्रबिंबींअमृतकळा । तेजदीधलेंरविमंडळा । जयादेवें १८ ज्याचीमर्यादासागरा । जे
णेंस्थापिलेंफणिवरा । जयाचेनिगुणेंतारा । अंतरिक्ष १९ ज्याचीखाणीचारीवाणी । चौऱ्यायशींलक्षयोनी ।
जेणेंनिर्मिलेलोकतिन्ही । तयानावदेव २० ब्रह्माविष्णुआणिहर । हेजयाचेअवतार । तोचिदेवहानिर्धार । नि
श्चयेंसी २१ देव्हारांचाउठोनिदेव । करूंनेणेसर्वजीव । तयाचेनिब्रह्मकटाव । निर्मिलानवचे २२ ठायींठा
यींदेवअसती । तिहींकेलीनाहींक्षिती । चंद्रसूर्यताराजीमूती । तयांचेनिनव्हे २३ सर्वकर्तातोचिदेव । पाहूंजा

१ फार सुलभ. २ दुःखें करून गमन करणेस कठीण. ३ पुष्कळ प्रकारचा. ४ आशा. ५ स्थिर. ६ विचार. ७ गर्व. ८ जग.

तांनिरवयव । ज्याचीकळालीलालाघव । नेणतीब्रह्मादिक २४ येथेंआशंकाउठिली । तीपुढिलियेसमासींफिटली । आतांवृत्तिसावधकेली । पाहिजेश्रोतीं २५ पैसअवकाशआकाश । कांहींचनाहींतेंभकाश । तयानिर्मळींवायूस । जन्मजाहला २६ वायुपासूनिझालावन्ही । वन्हिपासूनझालेंपाणी । ऐशीजयाचीकरणी । अघटितघडली २७ उदकापासूनसृष्टिझाली । स्तंभेंविणउभारली । ऐशीविचित्रकळाकेली । त्यानावदेव २८ देवेंनिर्मिलीहेक्षिती । तिचपोटींपाषाणेंहोती । तयासीचदेवम्हणती । विवेकहीन २९ जोसृष्टिनिर्माणकर्ता । तोयेसृष्टिपूर्वींहोता । मगहेतयाचीसत्ता । निर्माणझाली ३० कुलालपात्रपूर्वीआहे । पात्रकांहींकुलालनव्हे । तैसादेवपूर्वींचआहे । पाषाणनव्हेसर्वथा ३१ मृत्तिकेचेंसैन्यकेलें । कर्तेवेगळेराहिले । कार्यकारणएककेलें । तरीहोणारनाहीं ३२ तथापिहोईलपंचभौतिक । निर्गुणनव्हेकांहींएक । कार्यकारणांचाविवेक । भूतांपरतानाहीं ३३ अवघीसृष्टिजोकर्ता । तोएकसृष्टिहूनिपरता । तेथेंसंशयाचीवार्ता । काढूंचनये ३४ खांबसूत्रींचबाहुली । जेणेंपुरुषेंनाचविली । तोचिबाहुलीहेबोली । घडेकेवीं ३५ छायामंडपींचीसेना । सृष्टिसारिखीरचना । सूत्रेंचाळीपरीतोनाना । व्यक्तिनव्हे ३६ तैसासृष्टिकर्तादेव । परीतोनव्हेसृष्टिभाव । जेणेंकेलेनानाजीव । तोजीवकैसेनी ३७ जेंजयाकरणेंपडे । तोतेंनोहेकैसेंघडे । म्हणोनिवायांचिबापुडे । संदेहींपडती ३८ सृष्टिऐसेंचिस्वभावें । गोपुरनिर्मिलेंबरवें । परीतोगोपुरकर्तानव्हे । निश्चयेंसी ३९ तैसेंजगनिर्मिलेंजेणें । तोवेगळापूर्णपणे । एकम्हणतीमूर्खपणें । जगतोचिजगदीश ४० एवंजगदीशतोवेगळा । जगनिर्माणज्याचीकळा । तोसर्वांमध्येंनिराळा । असोनिसर्वीं ४१ म्हणोनिभूतांचाकर्दम । त्यासिअलिप्तआत्माराम । अविद्यागुणेंमायाभ्रम । सत्यचिवाटे ४२ मायोपाधिजगडंबर । आहेसर्वहिसाचार । ऐसाविपरीतविचार । कोठेंचिनाहीं ४३ म्हणोनिजगमिथ्यासाचआत्मा । सर्वांपरजोपरमात्मा । अंतरबाह्यअंतरात्मा । व्यापूनिअसे ४४ तयासम्हणावेंदेव । येरहेंअवघेंचिवाव । ऐसाआहेअंतरभाव । वेदांतींचा ४५ पदार्थवस्तुनाशवंत । हेंतोंअनुभवास । या





१ अग्नि. २ पृथ्वी. ३ दगड. ४ कुंभार. ५ उत्पन्न करणारा. ६ पात्र रूपी कार्य. ७ कारण रूपी मृत्तिका. ८ पंचमहाभूतें.

कारणेभगवंत । पदार्थावेगळा ४६ देवनिर्मळआणिअचळ । शास्त्रेंबोलतीसकळ । तयानिश्चळासचंचळ । ह्मणोनयेसर्वथा ४७ देवआलादेवगेला । देवउपजलादेवमेला । ऐसेंबोलतांदुरिताला । कायउणें ४८ जन्ममरणांचीवार्ता । देवासलागेसर्वथा । देवअमरजयाचीसत्ता । त्यासमृत्युकैसेनी ४९ उपजणेंआणिमरणें । येणेंजाणेंदुःखभोगणें । हेंत्यादेवाचेंकरणें । तोकारणावेगळा ५० अंतःकरणपंचप्राण । बहुतत्वींपिंडज्ञान । यासर्वांसआहेचळण । ह्मणोनिदेवनव्हती ५१ एवंकल्पनेरहित । तयानावभगवंत । तेथेंदेवपणाचीमात । भासतनाहीं ५२ तंवशिष्यैंआक्षेपिलें । तरीहेंकैसेंब्रह्मांडझालें । कर्तेपणेंकारणपडिलें । कार्यामध्यें ५३ द्रष्टेपणेंद्रष्टादृश्यीं । जेंसांपडेअनायासीं । कर्तेपणेंनिर्गुणासी । गुणतैसे ५४ ब्रह्मांडकर्ताकवण । कैसीत्याचीवोळखण । देवसगुणकींनिर्गुण । मजनिरूपावा ५५ एकह्मणतीत्याब्रह्मातें । इच्छामात्रेंसृष्टिकरितें । सृष्टिकरतेंत्यापरतें । कोणआहे ५६ आतांअसोहेबहुबोली । सकळमायाकोठूनिझाली । तेहेआतांनिरूपिली । पाहिजेस्वामी ५७ ऐसेंऐकूनवचन । वक्ताह्मणेसावधान । पुढिलियेसमासींनिरूपण । सांगिजेल ५८ ब्रह्मींमायाकैसीझाली । पुढेंअसेनिरूपिली । श्रोतींवृत्तिसावधकेली । पाहिजेआतां ५९ पुढेंहेंचिनिरूपण । विशदकेलेंश्रवण । जेणेंहोयसमाधान । साधकांचें ६० । । इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेअष्टमदशकेदेवदर्शननिरूपणंनामप्रथमःसमासः ॥ १ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः । । मागांश्रोतींआक्षेपिलें । तेंपाहिजेनिरूपिलें । निरवयवींकैसेंझालें । चराचर १ याचें ऐसेंप्रतिवचन । ब्रह्मजेंकांसनातन । तेथेंमायामिथ्याभान । विवर्तरूपभासे २ आदिएकपरब्रह्म । नित्यमुक्तअक्रियपरम । तेथेंअव्याकृतसूक्ष्म । जाहलीमूळमाया ३ ॥ ॥ श्लो० ॥ ॥ आद्यमेकंपरंब्रह्मनित्यमुक्तमविक्रियम् । तस्यमायासमावेशोजीवमव्याकृतात्मकम् १ एकब्रह्मनिराकार । मुक्तअक्रियनिर्विकार । तेथेंमायावोडंबेर । कोठूनिजाहली ४ ब्रह्मअखंडनिर्गुण । तेथेंइच्छाधरींकोण । निर्गुणींसगुणेंविण । इच्छानाहीं ५

१ स्थिर. २ दोष. ३ स्पष्ट. ४ भोंवरा. ५ कर्मरहित. ६ पसारा.

मूळींअसेचिनासगुण । ह्मणोनिनामेंनिर्गुण । तेथेंझालेंसगुण । कोणेपरी ६ निर्गुणचिगुणाआलें । ऐसेंजरी अनुवादलें । लागोंपाहेयेणेंबोलें । मूर्खपण ७ एकह्मतीनिरवयव । करूनअकर्तातोदेव । त्याचीलीलाबापुडेजीव । कायजाणती ८ एकह्मणतीतोपरमात्मा । कोणजाणेत्याचामहिमा । प्राणींबापुडाजीवात्मा । कायजाणे ९ उगाचमहिमासांगती । शास्त्रार्थअवघाचलोपिती । बळेंचनिर्गुणासह्मणती । करूनिअकर्ता । १० मूळींनाहींकर्तव्यता । कोणकरूनिअकर्ता । कर्ताअकर्ताहेवार्ता । समूळमिथ्या ११ जेंठायींचेंनिर्गुण । तेथेंकैचेंकर्तेपण । तरीहेइच्छाधरीकोण । सृष्टिरचावयाची १२ इच्छापरमेश्वराची । ऐसीयुक्तिबहुतेकांची । परीत्यानिर्गुणासइच्छाकैंची । हेंकळेना १३ तरीहेंइतुकेंकोणेंकेलें । किंवाआपणचिझालें । देवेंविणउभारलें । कोणेपरी १४ देवेंविणझालेंसर्व । ममदेवासकैंचाठाव । येथेंदेवाचाअभाव । दिसोनआला १५ देवम्हणोंसृष्टिकर्ता । तरीयेऊंपाहेसगुणता । निर्गुणपणाचीवार्ता । देवाचीबुडाली १६ देवठायींचानिर्गुण । तरीसृष्टिकर्ताकोण । कर्तेपणाचेंसगुण । नाशवंत १७ येथेंपडिलाकींविचार । कैसेंझालेंचराचर । मायाह्मणोंस्वतंत्र । तरीहेंविपरीतादिसे १८ मायाकोणीनाहींकेली । हेआपणचिविस्तारली । ऐसेंबोलतांबुडाली । देवाचीवार्ता १९ देवनिर्गुणस्वतःसिद्ध । त्यासिमायेसिकायसंबंध । ऐसेंबोलतांविरुद्ध । दिसोनआलें २० सकळकांहींकर्तव्यता । आलीमायेच्यामाथां । तरीभक्तांसिउद्धरिता । देवनाहींकीं २१ देवेंविणनुसतीमाया । कोणनेईलविलया । आह्मांभक्तांससांभाळाया । कोणीचनाहीं २२ ह्मणोनिमायास्वतंत्र । ऐसानघडेकींविचार । मायेसिनिर्मितासर्वेश्वर । तोएकचिआहे २३ तरीकैसाआहेईश्वर । मायेचाकैसाविचार । तरीहेंआतांसविस्तर । बोलिलेंपाहिजे २४ श्रोतींव्हावेंसावधान । एकाग्रकरूनियांमन । आतांकथानुसंधान । सावधऐका २५ ऐकेआशंकेचाभाव । जनींवेगळालेअनुभव । तेहिबोलिजेतीसर्व । यथानुक्रमें २६ एकह्मणतीदेवेंकेली । ह्मणोनिहेविस्तारली । देवासइच्छानसतीझाली । तरीहेमायाकैंची २७ एकह्मणतीदेवनिर्गुण । तेथेंइ



१ साकार. २ निराकार. ३ हस्तपादादि अवयव रहित. ४ कर्तृत्व शक्ति. ५ व्यर्थ. ६ जग, विश्व.

च्छाकरीकोण । मायामिथ्याहेआपण । जाहलीचनाहीं २८ एकह्मणतीप्रत्यक्षदिसे । तयेसिनाहींम्हणतांकैसें मायाहेअनादिअसे । शक्तिईश्वराची २९ एकह्मणतीसाचअसे । तरीहेज्ञानेंकैसीनिरसे । साचासारिखीच दिसे । परीहेमिथ्या ३० एकह्मणतीमिथ्यास्वभावें । तरीसाधनकासयाकरावें । भक्तिसाधनबोलिलेंदेवें । मायात्यागाकरणें ३१ एकह्मणतीमिथ्यादिसतें । भयअज्ञानसन्निपातें । साधनऔषधघेइजेतें । परीतेंदृश्य मिथ्या ३२ अनंतसाधनेंबोललीं । नानामतेंआंबावलीं । तरीमायानवचेत्यामिळी । मिथ्याकैसीह्मणावी । ३३ मिथ्याबोलेयोगवाणी । मिथ्यावेदशास्त्रींपुराणीं । मिथ्यानानानिरूपणीं । बोलिलीमाया ३४ मायामिथ्याम्हणतांगेली । हेवार्तानाहींऐकिली । मिथ्याम्हणतांचळागली । समागमें ३५ जयाचेअंतरींअज्ञान नाहींवोळखिलेसर्ज्जन । तयासमायामिथ्याभानें । सत्याचिवाटे ३६ जेणेंजैसानिश्चयकेला । तयासितैसाच फावला । पाहेतोचिदिसेबिंबला । तैसीमाया ३७ एकम्हणतीमायाकैंची । आहेतेंसर्वब्रम्हची । थिजल्यावि घुरल्याघृतांची । ऐक्यतानमोडे ३८ थिजलेंआणिविरघुलें । हेंस्वरूपींनाहींबोलिलें । साहित्यभंगलेंयेणेंबोलें ह्मणतीएक ३९ एकह्मणतीसर्वब्रह्म । हेंनकळेज्यासवर्म । तयाचेअंतरींचाभ्रम । गेलाचिनाहीं ४० एकम्हणतीएकचिदेव । तेथेंकैंचेंआणिलेंसर्व । सर्वब्रह्महेंअपूर्व । आश्चर्यवाटे ४१ एकह्मणतीएकचिस्वरें । तेथेंनाहींदुसरें । सर्वब्रह्मयेणेंप्रकारें । सहजाचिजाहलें ४२ सर्वमिथ्याएकसरें । उरलेंतेंचिब्रम्हखरें । ऐसींवाक्येंशास्त्राधारें । बोलतीएक ४३ अलंकारआणिसुवर्ण । तेथेंनाहींभिन्नपण । आटाआटीव्यर्थशिण । ह्मणतीएक ४४ हीउपमाएकदेशी । कैसीसाहेलवस्तूसी । वर्णव्यक्तअव्यक्तासी । साम्यतानघडे ४५ सुवर्णींदृष्टिघालितां । मूळींचआहेव्यक्तता । अलंकारसोनेंपाहतां । सोनेंचिअसे ४६ मूळींसोनेंचिव्यक्त । जडएकदेशिपीतं । पूर्णास अपूर्णाचादृष्टांत । केवींघडे ४७ दृष्टांततितकाएकदेशी । देणेंलागेकळायासी । सिंधुआणिलहरीसी । भिन्नत्व कैंचें ४८ उत्तममध्यमकनिष्ठ । एकादृष्टांतेंकळेस्पष्ट । एकादृष्टांतेंनष्ट । संदेहवाटे ४९ कैंचासिंधुकैंचील

१ खरी. २ दृष्टिगोचर होणारें त्रैलोक्य. ३ अंतःकरण. ४ साधु. ५ आभास. ६ घट्ट व पातळ. ७ तूप. ८ स्पष्ट. ९ पिवळें, सोनें.

हरी । अचळासचंचळाचीसरी । साचेंऐसीवोडंबरी । मानूंचनये ५० वोडंबरीहेकल्पना । नानाभासदाखवी जना । येरव्हींहेंजाणा । ब्रह्मचिअसे ५१ ऐसावादएकमेकां । लागतांराहिलीआशंका । तेचिआतांपुढेंऐका । सावधहोउनी ५२ मायामिथ्याकळोंआली । परीतेब्रह्मींकैसीझाली । म्हणावीतेनिर्गुणेंकेली । तरीतेमूळींच मिथ्या ५३ मिथ्याशब्दींकांहींचनाहीं । तेथेंकेलेंकोणेंकाई । कारणेंनिर्गुणाचाठायीं । हेंहिअघटित ५४ कर्ताठायींचाअरूप । केलेंतेंहिमिथ्यारूप । तथापिफेडूंआक्षेप । श्रोतयांचा ५५ । । इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेअष्टमदशकेआशंकानिरूपणंनामाद्वितीयःसमासः ॥ २ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः । अरेजेंझालेंचिनाहीं । त्याचीवार्तापुसशीकाई । तथापिसांगोंजेणेंकांहीं । संशयनुरे १ दोरीकरितांभुजंग । जळाकरितांतरंग । मार्तंडाकरितांचांग । मृगजळवाहे २ कल्पनेकरितांस्वप्नदिसे । शिंपीकरितांरूपेंभासे । जळाकरितांगारवसे । निमिषएक ३ मातीकरितांभिंतीझाली । सिंधुकरितांलहरीआली । तिळाकरितांपुतळी । दिसोंलागे ४ सोन्याकरितांअलंकार । तंतुकरितांझालेंचीरं । कांसवाकरितांविस्तार । हातांपांयांचां ५ तूपहोतेंतरीथिजलें । तरिकरितांमिठझालें । बिंबाकरितांबिंबझालें । प्रतिबिंब ६ पृथ्वीकरीतांझालेंझाड । झाडाकरितांछायावाड । धातुकरितांपवाड । उंचनीचवर्णाचा ७ आतांअसोहेदृष्टांत । अद्वैतासकैंचेंद्वैत । द्वैतेंविणअद्वैत । बोलोंचनये ८ भासाकरितांभासभासे । दृश्याकरितांदृश्यदिसे । अदृश्यासउपमानसे । म्हणोनिनिरुपम ९ कल्पनेविरहितहेत । दृश्यावेगळादृष्टांत । द्वैतावेगळेंअद्वैत । कैसेंजाहलें १० विचित्रभगवंताचीकरणी । वर्णवेनासहस्रफणी । तेणेंकेलीउभवणी । अनंतब्रह्मांडांची ११ परमात्मापरमेश्वर । सकळकर्ताजोईश्वर । तयापासूनिविस्तार । सकळजाहला १२ ऐसींअनंतनामेंधरी । अनंतशक्तिनिर्माणकरी । तोचिजाणावाचतुरीं । मूळपुरुष १३ त्यामूळपुरुषाचीवोळखण । तेमूळमायाचआपण । सकळकाहींकर्तेंपण । तेथेंचिआलें १४ । श्लोक । । कार्यकारणकर्तृत्वेहेतुःप्रकृतिरुच्यते । हेंउघडबोलतांनय । मोडोंपाहतोउपाय ।

१ बरोबरी. २ खरें. ३ संदेह. ४ सर्प. ५ लाटा. ६ सूर्य. ७ वस्त्र. ८ हजार आहेत फणा ज्यास तो सहस्रफणी (शेष.)

येन्हवींपाहतांकाय । साचआहे १५ देवापासूनसकळझालें । हेंसर्वांसमानलें[1] । परीत्यादेवासवोळखिलें । पाहिजेकीं १६ सिद्धाचेंजेंनिरूपण । तेंसाधकांनमनेंजाण । पक्कनाहींअंतःकरण । म्हणोनियां १७ अवि द्यागुणेंबोलिजेजीव । मायागुणेंबोलिजेशिव । मूळमायागुणेंदेव । बोलिजेतो १८ ह्मगोनिकारणमूळमाया । अनंतशक्तिधरावया । तेथींचाअर्थजाणावया । अनुभवीपाहिजे १९ मूळमायातोचिमूळपुरुष । तोचिसर्वां चाईश । अनंतनामीजगदीश । तयासीचबोलिजे २० अवघीमायाविस्तारली । परीहेंनिःशेषनाथिली । ऐ शीयावचनाचीखोली । विरळाजाणें २१ ऐसेंअनिर्वाच्यबोलिजे । परीहेंस्वानुभवेंजाणिजे । संतसंगेंविणनुम जे । कांहींकेल्या २२ मायातोचिमूळपुरुष । साधकांनमनेहेंनिःशेष । परीअनंतनामीजगदीश । कोणासह्म णावें २३ नामरूपमायेसलागलें । तरीहेंबोलणेंनीटचिझालें । तेथेंश्रोतींअनुमानिलें । कासयासी २४ आतां असोहेसकळबोली । मागीलआशंकाराहिली । निराकारींकैशीझाली । मूळमाया २५ दृष्टिबंधनमिथ्यासक ळ । परीतोकैसाझालाखेळ । हेंअवघेंनिवळ । करूनिदाऊं २६ आकाशअसतांनिश्चळ । मध्येंझालावायुचंच ळ । तैसीजाणावीकेवळ । मूळमाया २७ रूपवायूचेंझालें । तेणेंआकाशभंगलें । ऐसेंहेंसत्यमानिलें । नवचे कींकदा २८ तैसीमूळमायाझाली । आणिनिर्गुणतासंचली । येणेंदृष्टांतेंतुटली । मागीलआशंका २९ वा युनव्हेपुरातन । तैसीमूळमायाजाण । साचह्मणतांपुनःलीन । होतअसे ३० वायुरूपेंकैसाआहे । तैसीमूळमा यापाहे । असेपरीतेनलाहे । रूपतयेचें ३१ वायुसत्यह्मणोंजातां । परीतोनयेदाखवितां । तयाकडेपाहोंजा तां । धुळीचदिसे ३२ तैसीमूळमायाभासे । भासेपरीतेनदिसे । पुढेंविस्तारलीअसे । मायाआविद्यां ३३ जै सेंवायूचेनियोगें । दृश्यउडेगगनमार्गें । मूळमायेच्यासंयोगें । तैसेंजग ३४ गगनींआभाळनाथिलें । अकस्मातउ द्भवलें । मायेचेनिगुणेंझालें । तैसेंजग ३५ नाथिलेंचिगगननव्हतें । अकस्मातआलेंतेथें । तैसेंदृश्यझालेंयेथें । तैसियापरी ३६ परीतयाआभाळाकरितां । गगनाचीगेलीनिश्चळता । वाटेपरीतत्वतां । तैसेंचिआहे ३७ तै

१ संशय. २ अज्ञान. ३ आकाश.

सेंमायेकरितांनिर्गुण । वाटेझालेंसगुण । परीतेंपाहतांसंपूर्ण । जैसेंतैसें ३८ आभाळआलेंआणिगेलें । तरीग
गनतेंसंचलें । तैसेंगुणानाहींआलें । निर्गुणब्रह्म ३९ नभमाथांलागलेंदिसे । परीतेंजैसेंतैसेंअसे । तैसेंजाणावें
विश्वासें । निर्गुणब्रह्म ४० उर्ध्वपाहतांआकाश । नीलिंमादिसेसावकाश । परीतोजाणिजेमिथ्याभास । भा
सलाअसे ४१ आकाशपालथेंघातलें । चहूंकडेआटोपलें । वाटेविश्वाप्रकोंढिलें । परीतेंमोकळेंचिअसे ४२
पर्वतींनिळारंगादिसे । परीतोतयालागलानसे । अलिप्तजाणावेंतैसें । निर्गुणब्रम्ह ४३ रथधांवतांपृथ्वीचंचळ ।
वाटेपरीतेअसेनिश्चळ । तैसेंपरब्रह्मकेवळ । निर्गुणजाणावें ४४ आभाळाकरितांतोमयंक । वाटेधांवतोनिःशं
क । परीतेंअवघेंमायिकं । आभाळचळे ४५ जळअथवाअग्निज्वाळ । तेणेंकंपितदिसेअंतराळ । वाटेपरीतेंनि
श्चळ । जैसेंतैसें ४६ तैसेंस्वरूपहेंसंचलें । असतांवाटेगुणांआलें । ऐसेंकल्पनेंनेंसिगमलें । परीतेंमिथ्यां ४७
दृष्टिबंधनाचाखेळ । तैसीहेमायाचंचळ । वस्तुशाश्वतानिश्चळ । जैसीतैसी ४८ तैसीवस्तुनिरवयव । मायादा
खवीअवयव । इचाऐसाचिस्वभाव । नाथिलीचिहे ४९ मायापाहतांमूळींचनसे । परीहेसाचाऐसीभासे । उ
द्भवेआणिनिरसे । आभाळजैसें ५० ऐसीमायाउद्भवली । वस्तुनिर्गुणसंचली । अंहंऐसीस्फूर्तिझाली । तेचि
माया ५१ गुणमायेचेपवाडे । निर्गुणींहेंकांहींचनघडे । परीहेंघडेआणिमोडे । स्वस्वरूपीं ५२ जैसीदृष्टितर
ळली । तेणेंसेनाचभासली । पाहतांआकाशींचझाली । तरीतेंमिथ्या ५३ मिथ्यामायेचाखेळ । उद्भवबोलि
लासकळ । नानातत्वांचापाल्हाळ । मांडूनियां ५४ तत्वेंमूळींचआहेती । ओंकारवायूचीगती । तेथींचाअर्थ
जाणती । दक्षज्ञानी ५५ मूळमायेचेंचळण । तेंचिवायूचेंलक्षण । सूक्ष्मतत्वेंतेचिजाण । जडत्वपावली ५६
ऐसींपंचमहाभूतें । पूर्वींहोतींअव्यक्तें । पुढेंझालींव्यक्तें । सृष्टिरचनेंसी ५७ मूळमायेचेंलक्षण । तेंचिपंचभौ
तिकजाण । तेंचिपाहतांलक्षून । सूक्ष्मदृष्टीं ५८ आकाशींवायुविण । इच्छाशब्दकरीकोण । इच्छाशक्तितेचि
जाण । तेजस्वरूप ५९ मृदुपणतेंचिजळ । जडत्वपृथ्वीकेवळ । ऐसीमूळमायासकळ । पंचभौतिकजाणावी

१ साकार. २ वर. ३ नीलवर्ण. ४ स्थिर. ५ मायेपासून झालेलें तें मायिक–खोटें. ६ आकृतीस. ७ व्यर्थ. ८ स्थिर. ९ मी.

६० एकएकाभूतापोटीं । पंचभूतांचीराहाटी । सर्वकळेसूक्ष्मदृष्टीं । घालूनपाहतां ६१ पुढेंजडत्वासआली । तरीअसतीकालवली । ऐसीमायाविस्तारली । पंचभौतिक ६२ मूळमायापहातांमूळीं । अथवाअविद्याभूमंडळीं । स्वर्गमृत्युपाताळीं । पांचचिभूतें ६३ । । श्लोक । । स्वर्गेमृत्यौचपातालेयत्किंचित्सचराचरं । सर्वंतत्पांचभौतिकंयषष्ठंकिंचिन्नदृश्यते । टीका । सत्यस्वरूपआदिअंतीं । मध्येंपंचभूतेंवर्तती । पंचभौतिकजाणिजेश्रोतीं । मूळमाया ६४ जेथेंउठलीआशंका । सावधहोऊनऐका । पंचभूतेंझालींएका । तमोगुणापासूनी ६५ मूळमायागुणापरती । तेथेंभूतेंकैचींहोतीं । ऐसीआशंकाश्रोतीं । घेतलीमागां ६६ ऐसेंश्रोतींआक्षेपिलें । संशयासउभेंकेलें । याचेंउत्तरदीधलें । पुढिलियेसमासीं ६७ । । इतिश्रीदासबोधेगुरुशिष्यसंवादेअष्टमदशकेसूक्ष्मआशंकानिरूपणंनामतृतीयःसमासः ॥ ३ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशायनमः । । मागीलआशंकेचेंमूळ । आतांहोईलप्रांजळ । वृत्तिकरावीनिवळ । निमिषएक १ ब्रह्मीं मूळमायाझाली । तिच्यापोटींगुणमायाआली । मगतेगुणासप्रसवली । ह्मणोनिगुणक्षोभिणी २ पुढेंतिंजपासावकोण । सत्वरजतमोगुण । तमोगुणापासूननिर्माण । जाहलींपंचभूतें ३ ऐसींभूतेंउद्भवलीं । पुढेंतत्वेंविस्तारलीं । एवंतमोगुणापासूनझालीं । पंचमहाभूतें ४ मूळमायागुणापरती । तेथेंभूतेंकैचींहोतीं । ऐशीआशंकाश्रोतीं घेतलीमागें ५ आणिकएकएकेंभूतीं । पंचभूतेंआसती । तेहिआतांकैशीस्थिती । प्रांजळकरूं ६ सूक्ष्मदृष्टीचेंकौतुक । मूळमायापंचभौतिक । श्रोतींविमळविवेक । केलापाहिजे ७ आधिभूतेंतोंजाणावीं । रूपेंकैसींवोळखावीं । मगतींशोधूनपाहावीं । सूक्ष्मदृष्टीं ८ वोळखीनाहींअंतरीं । तेवोळखावीकोणेपरी । म्हणोनिवोळखीचतुरीं । नावेंकपरिसावी ९ जेंजेंजडआणिकठिण । तेंतेंपृथ्वीचेंलक्षण । मृदुआणिवोलेपण । तितुकेंआप १० जेंजेंउष्णआणिसतेज । तेंतेंजाणावेंवैतेज । आतांवायुहिसहज । निरूपिजेल ११ चैतन्यआणिचंचळ । तोहावायूचिकेवळ । शून्यअवकाशनिर्मळ । आकाशजाणावें १२ ऐशींपंचमहाभूतें । ओळखीधरावी

१ वागणुक. २ मनुष्यलोक. ३ पंचभूतांपासून झालेलें. ४ दिसत नाहीं. ५ स्पष्ट. ६ गुणाचा क्षोभ करणारी. ७ स्पष्ट. ८ विचार.

संकेतें। आतांएकींपंचभूतें। सावधऐका १३ जेत्रिगुंणाहूनिपर। त्याचासूक्ष्मविचार। यालागींअतितत्प र। होऊनिऐका १४ सूक्ष्मआकाशींकैसीपृथ्वी। तेचिआधींनिरूपावी। येथेंधारणाधरावी। श्रोतेजनीं १५ आकाशह्मणजेअवकाशशून्य। शून्यह्मणिजेतेंअज्ञान। अज्ञानह्मणिजेजडत्वजाण। तेचिपृथ्वी १६ आकाशस्व येंआहेमृद। तेंचिआपस्वतःसिद्ध। आतांतेजहिविशदं। करूनदाऊं १७ आज्ञानेंभासलाभास। तोचितेजाचा प्रकाश। आतांवायुसावकाश। साकल्यसांगों १८ वायुआकाशानाहींभेद। आकाशाइतुकाअसेस्तब्ध। तथापिआकाशींनिरुद्ध। तोचिवायू १९ आकाशींआकाशमिसळलें। हेंतोंनलगेचिबोलिलें। येणेंप्रकारेंनिरू पिलें। आकाशपंचभूत २० वायुमध्येंपंचभूतें। तिंहिंऐकाएकचित्तें। बोलिजतीसमस्तें। यथान्वयें २१ ह लुफुलतरीजड। हलुवारातरीनिबिड। वायुलागतांकडाड। मोडतीझाडें २२ तोलेविणझाडमोडे। ऐसेंहेंकाहीं चनघडे। तोलतोचितयेजडे। पृथ्वीचाअंश २३ येथेंश्रोतेआशंकाघेती। तेथेंकैंचींझाडेंहोती। झाडेंनव्हतीतरी शक्ती। कठिणरूपआहे २४ वन्हिस्फुलिंगलहान। कांहींतरीअसेउष्ण। तैसेंसूक्ष्मींजडपण। सूक्ष्मरूपें २५ मृदुपणतेंचिआप। भासेतेजाचेंस्वरूप। वायुतेथेंचंचळरूप। सहजचिआहे २६ सकळांसमिळोनआकाश। सहजचिआहेअवकाश। पंचभूतांचेअंश। वायुमध्येनिरूपिले २७ आतांतेजाचेंलक्षण। भासलेंपरीतेंचिक ठिण। तेजींऐसीवोळखण। पृथ्वीयेची २८ भासलाभासवाटेमृद। तेजींआपतेंचिप्रसिद्ध। तेजींतेजस्वतःसि द्ध। सागणेंनलगे २९ तेजींवायुचंचळ। तेजींआकाशनिश्चळ। तेजींपंचभूतेंसकळ। निरूपिलीं ३० आतांआपाचेंलक्षण। आपतेजींमृदुपण। मृदुपणतेंकठिण। तेचिपृथ्वी ३१ आपेंआपसहजचिअसे। तेजमृदु पणेंभासे। वायुस्तब्धपणेंदिसे। मृदुत्वाअंगीं ३२ आकाशनलगेसांगावें। तेंव्यापकचिस्वभावें। आणिपंच भूतांचींनावें। सूक्ष्मेंनिरूपिलीं ३३ आतांपृथ्वीचेंलक्षण। कठिणपृथ्वीआपजाण। कठिणत्वींमृदुपण। तेंचि आप। ३४ कठिणत्वाचाजोभास। तोचितेजाचाप्रकाश। कठिणत्वींनिरोधांश। तोचिवायु ३५ आका

१ सत्व. रज. तम. हे तीन गुण. २ बुद्धी ३ नव्हे जें ज्ञान तें अज्ञान. ४ स्पष्ट. ५ संपूर्ण.

शसकळांसव्यापक । हातोंप्रगटचिविवेक । आकाशींचकांहींएक । भासभासे ३६ आकाशतोडितांतुटेना । आकाशफोडितांफुटेना । आकाशपरतेंहोइना । तिळमात्र ३७ असोआतांपृथ्वीआंत । दाविलाभूतांचासंकेत । एकेभूतींपंचभूत । तेंहेंनिरूपिलें ३८ परीहेंआहाचपाहतांनातुडे । बळेंचपोटींसंदेहपडे । भ्रांतिरूपेंअहंताचढे । अकस्मात ३९ सूक्ष्मदृष्टीनेंपाहतां । वायूचिवाटेतत्वतां । सूक्ष्मवायूशोधूंजातां । पंचभूतेंदिसती ४० एवंपंचभौतिकपवनें । तेचिमूळमायाजाण । मायाआणिसूक्ष्मत्रिगुण । तेंचिपंचभौतिक ४१ भूतेंगुण मेळविजे । त्यांसिअष्टधाबोलिजे । पंचभौतिकजाणिजे । अष्टधाप्रकृती ४२ शोधूनपाहिल्याविण । संदेहधरणेंमूर्खपण । याचीपाहावीवोळखण । सूक्ष्मदृष्टीं ४३ गुणापासूनभूतें । पावलींस्पष्टदशेतें । जडत्वायेऊनि समस्तें । तत्वेंजाहलीं ४४ पुढेंतत्वाविवेंचना । पिंडब्रम्हांडतत्त्वरचना । बोललीसेतेजना । प्रगटचिआहे ४५ हाभूतकर्दमबोलिला । सूक्ष्मसंकेतेंदाविला । ब्रह्मगोळउभाराहिला । तत्पूर्वीं ४६ याब्रह्मांडापैलिकडीलगोष्टी । जैंझालीनह्वतीसृष्टी । मूळमायासूक्ष्मदृष्टीं । वोळखावी ४७ सप्तकंचुकप्रचंड । झालेंनह्वतेंब्रह्मांड । मायाअविद्येचेंबंड । ऐलीकडे ४८ ब्रह्माविष्णूमहेश्वर । हाऐलीकडीलविचार । पृथ्वीमेरूसप्तसागर । ऐलीकडे ४९ नानालोकनानास्थानें । चंद्रसूर्यतारांगणें । सप्तद्वीपेंचौदाभुवनें । ऐलीकडे ५० शेषकूर्मसप्तपाताळ । एकवीसस्वर्गअष्टादिक्पाल । तेहतीसकोटिदेवसकळ । ऐलीकडे ५१ बाराआदित्यअकरारुद्र । नवनागसप्तऋषीश्वर । नानादेवांचेअवतार । ऐलीकडे ५२ मेघमनुचक्रवर्ती । नानाजिवांचीउत्पती । आतांअसोसांगों किती । विस्तारहा ५३ सकळविस्ताराचेंमूळ । तेमूळमायाचकेवळ । मागांनिरूपिलेंसकळ । पंचभौतिक ५४ सूक्ष्मभूतेंजेबोलिली । तेचिपुढेंजडत्वाआली । तेहेसकळहीबोलिली । पुढिलियेसमासीं ५५ पंचभूतें पृथगाकारें । पुढेंनिरूपिलींविस्तारें । वोळखीकारणेंअत्यादरें । श्रोतींश्रवणकरावीं ५६ पंचभौतिकब्रह्मगोळ । जेणेंकळेहाप्रांजळ । दृश्यसांडूनकेवळ । वस्तूचिपाविजे ५७ महाद्वारवोलांडावें । मगदेवदर्शनघ्यावें । तैसेंद्द

१ अहंकार. २ वायु. ३ पंच महाभूतें. ४ सत्व. रज व तम हे तीन गुण. ५ आठ प्रकारचीं. ६ विसल, मेलन. ७ नक्षत्रें. ८ कांसव.

श्यहेंसांडावें । जाणोनियां ५८ ह्मणोनिदृश्याचेपोटीं । आहेपंचभूतांचीदाटी । एकपणेंपाडिलीमिठी । दृश्यपंचभूतां ५९ पंचभूतांचेंचदृश्य । सृष्टिरचिलीसावकास । श्रोतींकरूनिअवकाश । श्रवणकरावें ६० । । इतिश्री दासबोधेगुरुशिष्यसंवादेअष्टमदशकेसूक्ष्मपंचभूतनिरूपणंनामचतुर्थःसमासः ॥ ४ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

॥ ६ ॥ ॥ ४ ॥

श्रीगणेशायनमः । । केवळमूर्खतेनेणे । ह्मणोनिघडलेंसागणें । पंचभूतांचींलक्षणें । विशदकरूनी १ पंचभूतांचाकर्दमजाहला । आतांनवचेवेगळाकेला । परंतुकांहींवेगळाला । करूनदावूं २ पर्वतपाषाणशिळाशिखरें । नानावर्णेंलहानथोरें । खडेगुंडेबहुप्रकारें । जाणिजेपृथ्वी ३ नानारंगांचीमृत्तिका । नानास्थळोस्थळींजेकां । वाळुकेवाळुअनेका । मिळोनपृथ्वी ४ पुरेंपट्टणेंमनोहरें । नानामंदिरेंदामोदरें । नानादेवाल्येंशिखरें । मीळोनपृथ्वी ५ सप्तद्वीपवतीपृथ्वी । कायह्मणोनिसांगावी । नवखंडेंमिळोनिजाणावी । वसुंधरा ६ नानादेश नानानृपंती । नानाभाषानानारीती । लक्षचौऱ्याशींउत्पत्ती । मिळोनपृथ्वी ७ नानाउद्दसेंवनें । नानातरुवरांचींवनें । गिरिकंदरेंनानास्थानें । मिळोनपृथ्वी ८ नानारचनाकेलीदेवीं । जेजेनिर्मिलीमानवी । सकळमिळोनपृथ्वी । जाणिजेश्रोतीं ९ नानाधातुसुवर्णादिक । नानारत्नेंजींअनेकँ । नानाकाष्ठवृक्षादिक । मिळोनपृथ्वी १० आतांअसोहेंबहुवस । जडांशआणिकठिणांश । सकळपृथ्वीहाविश्वास । मानिलापाहिजे ११ बोलिलेंपृथ्वीचेंरूप । आतांसांगिजेलआप । श्रोतींओळखावेंरूप । सावधहोउनी १२ वापीकूपसरोवर । नानासरिताचेंजेंनीर । मेघआणिसप्तसागर । मिळोनआप १३ । । श्लोकार्द्ध । । क्षारक्षीरसुरासर्पिर्दधिइक्षुजलंतथा । । क्षारसमुद्रदिसताहे । सकळजनदृष्टीसपाहे । जेथेंलवणहोतआहे । तोचिक्षारसिंधू १४ एक दुधाचासागर । त्यानांवक्षीरसागर । देवेंदीधलानिरंतर । उपमन्यूसी १५ एकसमुद्रमद्याचा । एकजाणाघृताचा । एकनिखळदह्यांचा । समुद्रअसे १६ एकउसांच्यारसाचा । एकतोशुद्धजळाचा । ऐसासातांसमुद्रांचा । वेढापृथ्वीसी १७ एवंभूमंडळींचेंजळ । नानास्थळींचेंजेंसकळ । मिळोनअवघेंकेबळ । आपजाणावें ।

॥ ६ ॥

१ स्पष्ट. २ एकीकरण. ३ पृथ्वी. ४ राजे. ५ वृक्ष. ६ पर्वतांच्या गुहा. ७ एक नव्हे तीं अनेक (बहुत.) ८ तळाव व विहीर.

